# गीतांजली रविंद्रनाथांची

# माझ्या मराठीत

## - सौ. ज्योती कुळकर्णी

मा. महोदया,

रविंद्रनाथ टागोरांच्या “गीतांजली” ह्या काव्यसंग्रहाचे आपण केलेले मराठी अनुवाद पुस्तक “गीतांजली रविंद्रनाथांची माझ्या मराठीत” हे ई-संवाद जनचळवळीच्या www.marathipustake.org या संकेतस्थळास उपलब्ध करून दिल्याबद्दल आपले मनःपूर्वक आभार!!!!

आपली नम्र,

ई-संवाद जनचळवळ

**टंकलेखनः- राहुल प्रकाश सुवर्णा**

**मुद्रीतशोधनः- राहुल प्रकाश सुवर्णा**

तुझ्या आनंदासारखेच अपार.
मलाही निर्मिलेस तू अथांग
वारंवार रिते करिसी तू, हे तकलादू पात्र
नित्यनूतन जीवनरसाने भरिसी तूही ते मात्र
बासुरीसवे वेळूच्या, घुमविसी डोंगरदऱ्यांमधूनी,
चिरंतन नूतन संगीताचे श्वास फुंकरिसी त्यातूनी
तुझ्या करांच्या अमर्त्य स्पर्शे हृत्सीमा विरघळती
आनंदाने जन्मते त्यातून अनिवर्चनीय ती वाकशक्ती
अनंत दाने तुझी बरसती माझ्या लहान हाती
अविरत देणे सुरूच आहे. युगे लोटली तरीही
अन् स्वीकारण्यासाठी देखील जागा आहे अजूनी.

तू आज्ञा करतोस मला गाण्याची,
तेव्हा गर्वाने माझा ऊर फुटू पहातो,
तुझ्या चेहऱ्याकडे नजर वळते मात्र,
नि माझ्या डोळ्यांत अश्रू उभे राहतात.
आयुष्यातल्या कर्कश नि बेसूर गोष्टी विलयाला जातात.
एक मधुर, सुरेल संगीत जुळून येते
नि समुद्रावर भरारणाऱ्या आनंदी पक्ष्यासारखी,
तुझ्यावरची माझी भक्ती, आपले पंख पसरते
मला माहीत आहे, माझ्या गायनात तुला रस आहे.
आणि एक गायक म्हणूनच तुझ्या अस्तित्वासमोर मी येतो;
दूरवर विस्तारणाऱ्या माझ्या गानपंख्याच्या धारेने,
तुझे चरण स्पर्शू शकतो.
एरवी तेथपर्यंत पोहोचण्याची उत्कट इच्छा,
मला मनी बाळगता नसती आली.
गायनाच्या नशेत बेधुंद होऊन मी विसरतो स्वतःला,
नि साद घालतो माझ्या मित्राला, तुला जगन्नियंत्याला,
जो आहे स्वामी माझा.

हे जगन्नियंत्या स्वामी,
तुझे गान कसे असते ते मला कळत नाही.
शांत विस्मयात केवळ ते ऐकतो मी नेहमी.
तुझ्या संगीताचा प्रकाश टाकतो माझे विश्व उजळून
तुझ्या संगीताचा जीवनश्वास दौडत राहतो, नभानभांमधून
तुझ्या संगीताचा पवित्र झरा धावत सुटतो, दगडाधोंडयांना फोडून
तुझ्या गाण्यात सामील होण्याची हृदयी लागते आस.
पण ते व्यर्थ धडपडते, आवाज शोधण्यास.
मी बोलतो, पण बोलातून उमटत नाही गान.
मी गोंधळतो, नि करतो आर्त आकांत.
माझे हास्य बंदिस्त करून टाकले आहे रे नियंत्या
संगीताच्या असंख्य जाळ्यांनी तुझ्या.

हे जीवनचैतन्या,

माझी काया विशुध्द राखण्याचा मी सतत प्रयत्न करेन.

कारण मला माहीत आहे,

तुझा जीवनस्पर्श, माझ्या अंगाप्रत्यंगाला झाला आहे.

विचारांमधील अशुध्दता अन् असत्ये काढून टाकण्याचा,

मी सतत प्रयत्न करेन.

कारण मला माहीत आहे,

तूच ते सत्य आहेस, ज्याने माझ्या मनात कारणमीमांसेचा

प्रकाशदीप उजळला आहे.

हृदयातील सारी दुष्टता झुगारून देण्याचा मी सतत प्रयत्न करेन,

आणि फुलांमधले प्रेम जपेन

कारण मला माहीत आहे,

हृदयाच्या अंतस्थ गाभाऱ्यात, तुझेच आसन आहे.

आणि तुला माझ्या आचरणातून व्यक्त करावे म्हणून

प्रयत्नशील राहीन.

कारण मला उमजले आहे,

तुझीच शक्ती कार्य करण्यासाठी मला ऊर्जा पुरवत आहे.

तुज समीप रहावे क्षणभरी
हे लाड मागतो तुजजवळी
हातातील कामे सारी
उरकीन नंतर सगळी
तुझ्याविना ना चैन, शांती मग ह्रदयी
कार्ये मात्र उरती सारी, विनासाहिल त्या कष्टसागरी
येती आज गवाक्षी माझ्या, श्वास वसंताचे गुणगुणत
अंतरंगी फुलांच्या असे सुरू, भाट मधमाशांचे काव्यगायन
ही तर आहे वेळ, शांत निस्तब्ध बसण्याची,
परस्पर सन्मुख सान्निध्याची
ह्या शांत अन् तुडुंब सुखात, जीवन अर्पिणारे गाणे गाण्याची

खुडून घे हे लहानसे फूल; नको करूस उशीर
भीती आहे की ते जाईल गळून नि धुळीत पडून
पुष्पहारात तुझ्या, कदाचित मिळणार नाही त्याला स्थान
पण वेदनेच्या स्पर्शाने, तुझ्या हातांनी कर त्याचा सन्मान
नि घे ते फूल खुडून.
भीती आहे मला की कळण्यापूर्वी काही, दिवस जाईल संपून
तुला अर्पण करण्याची वेळही जाईल निघून
रंग नसला जरी त्याचा गहिरा,
सुवासही फिका असला,
तरी सामावून घे त्याला, सेवेमध्ये अपुल्या
वेळ आहे तोवरी, खुडून घे त्याला

माझ्या कवितेने, तिचा साजशृंगार थांबवला आहे.
तिला गर्व नाही, तिच्या वस्त्रप्रावरणांचा नि अलंकारांचा
आभूषणे बाधा आणतील आपल्यामधील एकत्वात,
उभी रहातील ती तुझ्यात आणि माझ्यात
विरून जाईल तुझी कुजबुज, त्यांच्या किणकिण आवाजात
फोल ठरते तुझ्यासमोर, माझ्या कवीपणातील फुशारकी
हे कविश्रेष्ठा, आलो आहे मी तुझ्या पायांशी,
जीवन माझे सरळ साधे करता येण्यासाठी
जणू अलगुजाची बासुरीच.
तुझ्या संगीताने तू ती भरून टाकावीस यासाठी.

राजपुत्राच्या पोशाखात सजलेले, रत्नमाला गळ्यात घातलेले मूल
हरवते खेळातले सारे सुख
त्याचा वेष आणतो अडथळा, पावलापावलाला
कपडे फाटतील, धुळीने डाग पडतील ह्या भीतीने,
ते दूर ठेवते स्वतःला
घाबरते जराशीही हालचाल करायला
माते, तुझा तो ऐटबाज पोशाख,
जमिनीवरील निरामय धुळीपासून जर कोणाला ठेवणार असेल दूर,
सामान्य मानवी जीवनाच्या महान जत्रेत शिरायचा हक्क
जर घेणार असेल हिरावून
तर काहीच लाभ मिळणार नाही त्यातून.

मूढा, प्रयत्न करतोस उचलायचा
स्वतःच्याच खांद्यांवरती स्वतःला,
याचका, स्वतःच्याच द्वारापाशी
याचनेसाठी यायला
सोपव त्याच्या हाती, सारी तुझी ओझी,
समर्थ आहे जो, पेलण्या सर्व काही.
आणि मागे वळून दुःखाने, पाहू नकोस कधीही.
तात्काळ विझवते तुझी लालसा, त्या दिव्याचा प्रकाश,
ज्याला स्पर्शला आहे त्याचा श्वास.
अपवित्र आहे हे सारे,
नको घेऊस त्याचे उपहार, त्या अस्वच्छ हातांनी
तेच घे केवळ, दिले आहे जे पवित्र प्रेमानी.

पाय टेकवायचा तुझा चौरंग आहे ह्या इथे,
तुझी पावले मात्र आराम करताहेत त्या तिथे,
त्या दरिद्री, कमजोर नि पराभूत लोकांमध्ये
पहातो मी टेकवायला माथा तुझ्या पायी,
पण गाठू शकत नाही तेवढी खोली काही
जिथे विसावलेली आहेत तुझी पावले,
त्या दरिद्री, कमजोर नि पराभूत लोकांमध्ये
थारा नाही गर्वाला जराही तेथे
साध्याशा वस्त्रात तू चालतो आहेस जेथे
त्या दरिद्री, कमजोर नि पराभूत लोकांमध्ये
हृदयाला माझ्या तेथपर्यंत काढता येत नाही मार्ग
जिथे आहे तुझा सहवास, सगेसोबती नसलेल्या माणसात,
त्या दरिद्री, कमजोर नि पराभूत लोकांत.

थांबवा हा मंत्रघोष, भक्तीगान आणि जपमाळा
देवळाच्या ह्या अंधाऱ्या कोपऱ्यात
सर्व दारे बंद करून, तुम्ही कोणाची भक्ती करता आहात?
डोळे उघडा नि पहा की तुमचा देव तुमच्यासमोर नाहीच!
तो आहे, कठीण जमिनीची मशागत करणाऱ्याजवळ!
आणि रस्ता तयार करणाऱ्या दगडफोडयाजवळ!
उन्हापावसात तो त्यांच्यासोबत आहे,
त्याचेही कपडे धुळीने माखले आहेत.
विझवा तो पवित्र अग्निकलश आणि
त्याच्यासारखेच, धुळीने माखलेल्या जमिनीवर उतरा.
मोक्ष? कुठे सापडणार आहे हा मोक्ष?
परमेश्वराने आनंदाने स्वतःहूनच स्वीकारले आहेत निर्मितीचे बंध.
तो कायमचा गुंतलेला आहे आपल्या सर्वांसोबत.
बाहेर पडा तुमच्या ध्यानधारणेतून,
बाजूला ठेवा ती फुले, धूप नि उदबत्त्या
तुमचे कपडे फाटले, त्यावर डाग पडले,
तरी असे काय मोठे नुकसान होणार आहे?
भेटा त्याला आणि स्वतःच्या निढळाच्या घामात
त्याच्या सोबतीने उभे रहा.

माझा प्रवास दीर्घकाळ चालणार आहे
पल्लाही बराच लांबचा आहे
प्रकाशाच्या पहिल्या किरणासोबत मी झालो आहे रथारूढ,
मागोवा ठेवून आलो आहे, ग्रहताऱ्यांमधून
तुझ्या सर्वाधिक जवळ येण्याचा
हा सर्वात लांबचा मार्ग आहे
सुराची अती सरलता ज्यात गवसते,
ते सर्वात क्लिष्ट प्रशिक्षण आहे.
पोहोचण्यासाठी आपल्या दरवाजापाशी
ठोठवावे लागते प्रवाशाला, प्रत्येक परके दार.
फिरावे लागते सर्व बाह्य जगतात,
पोहोचण्या अंती गाभाऱ्यात
मिटण्यापूर्वी डोळे माझे, भटकले सर्वदूर
आणि मिटताना म्हणाले, ‘इथे आहेस तर तू!”
प्रश्न आणि क्रंदन, ‘अरे, आहेस तरी कुठे तू?’
विरघळून गेले सारे, हजारो झऱ्यांच्या अश्रूत
आश्वासक पूर आला, विश्वाच्या महाप्रलयात, ‘आहे मी!’

जे गाणे गायला आलो होतो मी,
ते गायचे अजून राहून गेले आहे.
वाद्याच्या तारा जुळवण्याच्या खटाटोपातच, मी दिवस घालवले
खरी वेळ आलीच नाही
योग्य शब्दांची जुळवणी झालीच नाही.
इच्छा फक्त सलते आहे हृदयात
बहर फुललाच नाही, वाऱ्याचे आहेत फक्त निश्वास.
ना पाह्यला मी त्याचा चेहरा, ना ऐकला आहे आवाज
ऐकला आहे केवळ, घरासमोरून जाणाऱ्या रस्त्यावर,
त्याचा हलकासा पायरव.
आयुष्याचा दिवस सरत आहे,
जमिनीवर त्याच्यासाठी आसन अंथरण्यातच.
पण दिवा काही उजळलेला नाही.
अन् घरी त्याला बोलावता येत नाही.
त्याला भेटायच्या आशेत जगतो आहे मी.
पण ही भेट घडत नाही, अजूनही काही.

माझ्या इच्छा अनेक आहेत,
माझा आकांतही आर्त आहे,
पण तू मात्र,
कठोर नकारांनी मला कायम वाचवीत आला आहेस.
आणि त्या कणखर दयेनेच आयुष्यभर मला घडवीत आला आहेस!
न मागताही तू दिलेल्या त्या साध्य आणि महान भेटी,
हे आकाश आणि प्रकाश,
हे तन, मन आणि जीवन
त्या स्वीकारण्यासाठी,
मला अती लालसेच्या नाशातून वाचवून,
दिवसेंदिवस तू मला लायक बनवीत आहेस!
कित्येकदा मी सुस्तावून रेंगाळतो
कधी सजग होऊन, उद्दिष्टाच्या शोधार्थ उगाच घाई करू लागतो
त्यावेळी मात्र, तू क्रूरपणे तुला स्वतःला माझ्यासमोरून लपवतोस.
मला वरचेवर नाकारून,
दुर्बल, अनिश्चित इच्छेच्या नाशातून वाचवून,
माझा संपूर्ण स्वीकार करण्यासाठी
दिवसेंदिवस तू मला लायक बनवीत आहेस!

तुझे गाणे गायला मी इथे आलोय,
तुझ्या दरबारी एका कोपऱ्यात बसलोय.
माझ्यासाठी नाही काम, तुझ्या या जगतात,
अहेतुक स्वरलहरीच फक्त उमटतात.
माझ्या निरूपयोगी आयुष्यात!
निशेच्या काळोख्या मंदिरात, तुझ्या शांत भक्तीचा प्रहर येतो जेव्हा,
हे स्वामी, तुझ्यासमोर गायला उभे रहायची आज्ञा कर मला तेव्हा
पहाटेच्या हवेत सोनेरी वीणा झंकारेल तेव्हा,
आज्ञेने मला बोलावण्याचा सन्मान कर देवा!

या जगाच्या उत्सवाचे मला निमंत्रण मिळाले होते
म्हणून माझ्या आयुष्याला वरदान लाभले होते
माझ्या डोळ्यांनी खूप पाहिले नि कानांनी खूप ऐकले.
वाद्यातून बोल काढून, मी भाग घेतला ह्या मेजवानीमध्ये
आणि जेवढे म्हणून करता येईल तेवढे सारे केले.
आता अखेरी मी विचारतो आहे,
आत येऊन तुझे दर्शन घ्यावे,
नि माझे शांत वंदन तुला समर्पित करावे,
अशी वेळ खरोखर झाली आहे का बरे?

थांबलोय मी फक्त प्रेमासाठी
अंती त्याच्या हाती मला सोपवून देण्यासाठी
म्हणूनच तर झालाय एवढा उशीर मला
आणि ठरतोय मी अपराधी, कर्तव्यच्युतीबद्दल अशा
ते येतात, त्यांचे कायदेकानू घेऊन
बंधनात चटकन मला टाकतात पाडू
पण टाळतो मी त्यांना, नेहमीच युक्ती करून.
कारण, थांबलोय मी फक्त प्रेमासाठी
अंती त्याच्या हाती, मला सोपवून देण्यासाठी
लोक मला दोष देतात; निष्काळज़ी म्हणतात.
त्यांचे दोषारोप खरे आहेत का,
याची नाही घेत मी शंका.
संपला आहे आता बाजाराचा दिवस
आटोपली आहेत कामे, लोकांची त्या व्यस्त
जे मला बोलवायला आले होते व्यर्थ,
ते रागावून गेले आहेत परत.
थांबलोय मी फक्त प्रेमासाठी
अंती त्याच्या हाती मला सोपवून देण्यासाठी.

मेघांची दाटी होते नि अंधारते.

ओह! माझ्या प्रेमा, मला एकटयाला का बरं ठेवले आहेस दाराबाहेर?

मी असतो गर्दीसोबत, कामाच्या व्यस्त क्षणांमध्ये दुपारी

पण ह्या काळोख्या दिवशी, मला आशा आहे फक्त तुझी.

तू जर दाखवला नाहीस मला तुझा चेहेरा,

सारलेस जर मला पूर्णपणे बाजूला,

तर कोण जाणे,

हे लांबलचक पावसाळी तास, मी कसे काढणार?

मी एकटक पहातो आहे; दूरवर पसरलेल्या आकाशाच्या उदासीत,

नि माझे हृदय भरकटते आहे, अस्वस्थ वाऱ्यासोबत विलाप करीत.

तू जर बोलला नाहीस माझ्याशी,
तर तुझ्या मौनात मी माझे हृदय भरून घेईन.
मी मुकाटयाने सोसत राहीन
मी राहीन निश्चल
ताऱ्यांचा जागृत पहारा देणाऱ्या
आणि सहनशीलतेने माथा झुकवणाऱ्या रात्रीसारखा
थांबून राहीन अविचल.
सकाळ नक्कीच होईल, काळोख नाहीसा होईल.
आणि गगनाला भेदून टाकत,
सोनेरी झऱ्यातून तुझा आवाज बरसत राहील.
मग तुझे शब्द पंख घेतील,
मम पक्ष्याच्या प्रत्येक घरटयातून, गाण्यामध्ये
आणि तुझी सुरेल गीते
वनातली होतील फुले

हाय रे दैवा!
कमळ उमलले त्या दिवशी माझे मन कुठेतरी भरकटत होते
ते फुललंय हे मला कळलेही नाही!
परडी राहिली रिक्त आणि फूल राहिले उपेक्षित.
पुन्हा पुन्हा दाटते आता दुःखाची छाया
स्वप्रातून माझ्या मी झालो आहे जागा.
दक्षिणेच्या वाऱ्यात जाणवलाय मला,
अनोळखी गंध, गोड हलकासा.
अनामिक त्या गोडव्याने, व्याकुळले हृदय
नि लागली आहे तुझी ओढ
मनाला वाटते की तो होता श्वास,
पूर्णत्व शोधणाऱ्या उत्सुक वसंताचा
तेव्हा मला माहीत नव्हते, गंध एवढा निकट आहे,
शिवाय माझ्या हक्काचा आहे
नि हा परिपूर्ण गोडवा तर
माझ्याच हृदयातून बहरलेला आहे.

माझी नाव मला प्रवाहात हाकारायलाच हवी!
सुस्तावलेले तास किनाऱ्यावर तसेच निघून चाललेत.
हाय रे माझ्या दुर्दैवा!
वसंतऋतूने फुलांना बहर आणला नि रजा घेतली
आणि आता,
रंग उडालेल्या निरर्थक फुलांचे ओझे वागवत मी प्रतीक्षा करतोय
नि रेंगाळतोय.
लाटांचा गलबला वाढतोय;
किनाऱ्यावरच्या त्या झाकोळलेल्या गल्लीत पिवळी पाने फडफडताहेत
नि गळून पडताहेत!
कुठल्या रितेपणात तू टक लावून पहातो आहेस!
पलीकडच्या किनाऱ्यावरून वाऱ्यासोबत लहरत येणाऱ्या गाण्याच्या
सुराची थरारणारी अनुभूती तुला जाणवत नाही काय?

पावसाळी आषाढाच्या गर्द काळोख्या सावल्यांमधून,
गुप्त पावलांनी सुरू आहे तुझी वाटचाल
रात्रीसारखीच स्तब्ध, सर्व दर्शकांना चुकवत.
मोठयाने गर्जून वारंवार साद घालणाऱ्या पूर्वेकडच्या वाऱ्याकडे दुर्लक्ष करीत,
सकाळ आज आपले डोळे मिटून बसली आहे.
आणि नित्य जागृत असणाऱ्या निळ्याशार आभाळाने,
जाड दुलई ओढून घेतली आहे.
वनातली गाणी दबून गप्प राहिली आहेत
हरएक घराचा दरवाजा बंद आहे
या निर्जन रस्त्यावर तू एकटाच वाटसरू आहेस.
माझ्या एकमेव मित्रा, सर्वाधिक लाडक्या,
घराचे दरवाजे उघडे आहेत माझ्या
बाजूने त्यांच्या, निसटू नकोस एखाद्या स्वप्नासारखा

माझ्या मित्रा,

प्रेमाच्या प्रवासात, या वादळी रात्री तू परदेशी गेला आहेस का?

निराशाग्रस्त झाल्यासारखे कण्हते आहे आकाश!

आज झोप नाही मला रात्रभर!

माझ्या मित्रा, पुनःपुन्हा दरवाजा उघडून मी पहातोय काळोखात

काहीच दिसत नाहीये मला पुढे

कुठे बरं असेल तुझा मार्ग? मी विचारात!

शाईसारख्या काळ्याकुट्ट नदीच्या कोणत्याशा अंधुक किनाऱ्यावर

रागीट वनाच्या कुठल्याशा दूरच्या टोकावर

उदासीनतेच्या गुंतागुंतीच्या गहनतेतून मार्ग काढीत, माझ्या मित्रा

कोणत्या रस्त्याने तू माझ्याकडे यायला निघाला आहेस?

दिवस मावळला, पक्ष्यांची किलबिलही बंद झाली,
थकूनभागून वाराही निश्चल पडला, की
गडद अंधाराची चादर ओढ माझ्यावरून
सृष्टीवर तू निद्रेचे पांघरूण घातले असलेस,
नि कमळाच्या झुकलेल्या पाकळ्या संध्यासमयी अलगद मिटून
टाकलेल्या असल्यास, तरीही.
ज्या प्रवाशाकडची शिदोरी सफर पूर्ण होण्याआधीच संपलेली आहे,
वस्त्रे जीर्णशीर्ण व मलीन झाली आहेत.
शक्तीही लयाला गेलेली आहे.
त्याची लाचारी व दारिद्र्य दूर कर आणि
तुझ्या कृपाळू रजनीच्या छायेखाली,
एखाद्या फुलाप्रमाणे त्याला नवजीवन दे.

तुझ्यावरील विश्वासावर विसंबून,
काहीही धडपड न करता,
थकल्या भागल्या रात्री, मला निद्रेच्या स्वाधीन होऊ दे.
माझ्या फडफडणाऱ्या आत्म्यावर,
तुझ्या आराधनेसाठी निकृष्ट तयारी करण्याची जबदरस्ती
मी करता कामा नये
जागृतीच्या ताज्या आनंदात,
दिवसाला नवदृष्टी देण्यासाठी
त्याच्या थकल्या भागल्या नयनांवर
निद्रेचे पांघरूण घालणारा,
तूच तर आहेस!

तो आला आणि माझ्याजवळ बसला,
तरीही मला जाग आली नाही.
अरे देवा! कसली शापित निद्रा होती ती!
किती दुर्दैव मी!
तो आला तेव्हा रात्र निश्चल होती
त्याच्या हातात त्याची वीणा होती
माझी स्वप्ने त्या नादमधुर झंकाराशी तन्मय झाली होती
हाय रे दैवा! माझ्या सर्व रात्री अशा हरवतात का?
ज्याचा श्वास माझ्या झोपेला स्पर्शतो,
त्याच्या दर्शनाला मी नेहमी का बरं मुकतो?

प्रकाश, कुठे आहे तो प्रकाश?
इच्छेच्या धगधगत्या आगीने तो उजळवा,
दिवा आहे, पण फक्त मिणमिणता.
माझ्या ह्रदया हेच आहे का तुझं प्राक्तन?
अरे, तुझ्यासाठी मृत्यूच तर चांगला आहे याहून
दुःख ठोठावतंय तुझा दरवाजा,
संदेश आहे त्याचा की
जागृत आहे स्वामी तुझा, आणि रात्रीच्या काळोखातून
बोलावतोय तो तुला, तुझ्या प्रेमसंकेताकडे.
नभात मेघ दाटले आहेत आणि पाऊस अविरत कोसळतो आहे
ह्रदयात माझ्या कसली कालवाकालव होत आहे, कळत नाही
तिचा अर्थ मला उमलत नाही
क्षणभरच चमकलेली वीज नजरेसमोर
आणखीनच काळोखी आणते आहे,
ह्रदय चाचपडतंय,
रात्रीचं संगीत जिथून मला साद घालतंय, तो मार्ग शोधण्यासाठी
प्रकाश, कुठे आहे तो प्रकाश? उजळवा त्याला
गडगडाट झाला नि सुसाटयाने आवाज करत वारा
त्या पोकळीत शिरला,
काळ्या पाषाणासारखी रात्र काळी आहे
प्रहरच्या प्रहर काळोखातच उलटून गायला नकोत
तुझ्या जीवनाने प्रेमाचा दीप उजळू दे.

बेडया आहेत तर दुराग्रही,
पण तोडायचा प्रयत्न केला, तर काळजात उठते कळ
हवंय खरं तर मला स्वातंत्र्य.
पण तशी अपेक्षा करायलाही वाटते शरम
खात्री आहे मला की, तुझ्यातच आहे अगणित संपत्ती;
आहेस तूच, माझा सर्वोत्तम सांगाती
परंतु माझ्याकडे नाही तेवढं धाडस,
जागेत भरून राह्यलेला बेगडी भपका झाडून टाकण्याचं.
मला आच्छादणारे प्रेतवस्त्र आहे धूळ आणि मृत्यूचे
तिरस्कार करतो; तरीही, कवटाळून धरले आहे मी ते प्रमाने
कर्जे माझी मोठमोठी, अपयशही मोठे, शरम गुप्त अन् प्रचंड भारी
तरीही, तुझ्याकडे मागताना, माझं भलं करण्याचे मागणे
थरथर कापतो मी भीतीने.
माझी प्रार्थना मान्य होईल या भयाने.

माझ्या नावाशी निगडित असलेला तो,
ह्या अंधारकोठडीत रडतो आहे;
सभोवताली ही भिंत बांधताना मी कायमचा व्यस्त आहे
ही भिंत जशी जाते आहे उंच उंच आभाळात
हरवतेय माझे खरे स्वत्व तिच्या सावलीच्या काळोखात
मला गर्व आहे ह्या महान भिंतीचा
बट्टा लागू नये जराही तिच्या नावाला
उरू नये छिद्रही जरा
म्हणून तीवर देतोय मी, धूळ आणि वाळूचा मुलामा
नि हरवतेय माझे सत्य स्वरूप, ही काळजी वहाताना

मार्गावरून वाटचाल करत, संकेतानुसार मी एकटाच आलो.
पण ह्या नीरव काळोखात हा कोण बरं येतोय माझ्या पाठोपाठ?
टाळण्यासाठी त्याला, मी होतो बाजूला
पण चकवता काही येत नाही त्याला
मस्तवालपणे तो उडवतो जमिनीवरची धूळ
माझ्या प्रत्येक शब्दात मिसळतो त्याचा उच्च सूर
तो आहे माझंच छोटं लहान रूप
माझ्या देवा, कसलीही लाज नाही त्याला!
पण मी मात्र शरमतो, त्याचासोबत तुझ्या दारी यायला.

‘बंदिवाना, सांग मला, कोणी बंदी केलं तुझा?’
‘माझ्या मालकाने, ‘ कैदी उत्तरला.
‘मला वाटलं, सत्ता आणि संपत्तीच्या बाबतीत,’
‘मी मागे टाकू शकेन जगातल्या प्रत्येकाला’
‘माझ्या खजिन्यात मी जमवली रास,
राजाला देय असलेल्या धनाची.
झोप झाली जेव्हा अनावर,
पहुडलो मी मालकाच्या बिछान्यावर
जाग आली तेव्हा कळलं,
स्वतःच्याच खजिन्यात मी झालो होतो बंदी!’
‘बंदिवाना, सांग मला, कोणी घडवली ही अतूट शृंखला?’
‘मीच तो,’ कैदी उत्तरला.
‘मीच काळजीपूर्वक तयार केली ही शृंखला.’
‘वाटलं, जगाला बंदी बनवेल माझी अजिंक्य सत्ता,
नि मला मात्र देईल अखंड मुक्तता.
म्हणून साखळीवर त्या काम करीत बसलो दिवसा अन् रात्रीही.
मोठमोठया ज्वाळांनी आणि पाशवी घणाघाती घावांनी.
अखेर संपलं जेव्हा सारं काम,
दुवे साखळीचे होते बनले अतूट आणि भक्कम.
केलं होतं त्यांनी मलाच, त्यांच्या पाशात जेरबंद.’

या जगात माझ्यावर प्रेम करणारे,
प्रयत्न करतात हरतऱ्हेने,
मला सुरक्षित पकडून ठेवण्याचे!
पण तुझ्या प्रेमाच्या बाबतीत मात्र आहे उलटेच!
या सर्वांच्या प्रेमाहुनही महान असलेले तुझे प्रेम,
मला ठेवते मोकळे!
मी त्यांना विसरेन या भयाने
मला एकटयाला सोडण्याचे धैर्य काही त्यांना होत नाही
पण दिवसांमागून दिवस उलटले तरी, तू नजरेसही पडत नाहीस.
माझ्या प्रार्थनेतून तुला मी आवाहन केले नाही तरी,
हृदयात माझ्या, साठवून ठेवले नाही जरी,
थांबून रहाते तुझे प्रेम, माझ्या प्रेमासाठी तरीही.

दिवसाउजेडी ते आले माझ्या घरी आणि म्हणाले,
‘इथली लहानशी खोली तेवढी आम्ही घेऊ,
तुझ्या देवभक्तीत तुला मदत करू, आणि
त्याच्या कृपतेला आमचा वाटा तेवढा नम्रतेने स्वीकारू.’
मग त्यांनी मांडलं बस्तान, एका कोपऱ्यात,
आणि बसून राह्यले, दबून अन् शांत.
पण कळलं मला रात्रीच्या काळोखात
माझं पवित्र देवालय फोडून ते घुसले आहेत आत
शक्तिशाली आणि हिंस्त्र असे ते,
देवाच्या वेदीवरून अपवित्र हावरेपणाने
हिसकावून घेत आहेत, सारे काही त्याला वाहिलेले.

मी राहू दे अल्पस्वल्प तेवढा बाकी
ज्यायोगे, मला वहाता येईल सर्व काही तुझ्या ठायी
माझी तेवढीच इच्छा केवळ राहू देत बाकी
ज्यायोगे, तू जाणवशील मला हरेक जागी.
येईन मी तुझ्याकडे प्रत्येक गोष्टीसाठी
आणि अर्पेन माझं प्रेम, तुला हरक्षणी
मी राहू दे अल्पस्वल्प तेवढा बाकी
ज्याजोगे लपवणार नाही मी तुला कधी
राहू देत माझ्या अल्पस्वल्प तेवढया शृंखला
ज्याजोगे, राहीन मी तुझ्या इच्छेने बांधलेला.
प्रत्यक्षात आणीन तुझा, माझ्या जीवनामागचा हेतू
तुझ्या प्रेमाचे बंधन, हाच तो हेतू.

जिथे मन भयमुक्त आहे आणि माथा उंचावलेला आहे,
जिथे ज्ञान मुक्त आहे,
जिथे संकुचितपणाच्या घरगुती भिंतींनी,
जगाचे तुकडे पाडलेले नाहीत,
जिथे शब्द सत्याच्या खोल दरीतून उमटत आहेत,
जिथे अथक परिश्रम आपले बाहू पसरून,
पूर्णत्वाकडे झेपावताहेत,
मृतप्राय रूढींच्या भयानक वाळवंटात
जिथे कारणमीमांसेचा निर्मळ झरा लुप्त झालेला नाही,
सतत विस्तारणाऱ्या नि प्रगत होणाऱ्या विचारात आणि कृतीत
जिथे तू मनाला पुढचा मार्ग दाखवीत आहेस,
अशा स्वतंत्रतेच्या त्या नंदनवनात,
हे तात, माझा देश जागृत होवो.

तुझ्याकडे माझी ही प्रार्थना आहे देवा,
माझ्या हृदयाच्या आत्यंतिक दारिद्र्यावर तू घाव घालीत रहा.
माझी सुखदुःखे हलकेच सहन करण्याचे बळ मला दे.
माझं प्रेम, सेवेत फलदायी करण्याचे सामर्थ्य मला दे.
गरिबांना न झिडकारण्याचं वा
उन्मत्त शक्तीपुढे न झुकण्याचं बळ मला दे
हररोजच्या क्षुद्र गोष्टींपलीकडे जाऊन,
मन उन्नत करण्याचं सामर्थ्य मला दे
आणि माझी शक्ती, तुझ्या इच्छेपुढे प्रेमाने शरण येईल,
असं बळ मला दे.

मला वाटलं,
गाठली आहे मी, माझ्या शक्तीची अंतिम परिसीमा.
संपत आलाय प्रवास, बंद झालाय रस्ता
संपली आहे रसद.
आली आहे वेळ, निस्तब्ध दुर्बोधतेत आश्रय घेण्याची.
परंतु तेव्हा मला कळते की
दिसत नाहीये तुला, अजूनी माझ्यात अंत.
मृत शब्दांची रसवंती खुंटते जेव्हा,
नवसुरेल संगीत, हृदयी उमटते तेव्हा!
अन् जुनेपुराणे मार्ग संपती जेथे
नवप्रदेश आकलतो चमत्कृतींचा तेथे.

मला तू आणि तूच फक्त हवा आहेस,
अनंतवार माझं हृदय हेच केवळ उगाळू दे.
रात्रंदिवस मला विचलित करणाऱ्या सर्व इच्छा,
मुळातूनच रिक्त आणि फसव्या आहेत.
रात्र जशी आपल्या उदासीत
लपवून ठेवते प्रकाशाची विनंती
अगदी तसेच, माझ्या निद्रिस्त गहनतेतून देखील
निनादत रहातो, आकांत,
‘मला तू आणि तूच फक्त हवा आहेस’
सर्व सामर्थ्यानिशी वादळ जसे शांततेविरूध्द धडकते,
आणि अखेर आपला अंत शांततेतच शोधते;
अगदी तसेच, माझे बंड तुझ्या प्रेमावर आदळते,
आणि तरीही आक्रंदते, ‘मला तू आणि तूच फक्त हवा आहेस.’

हृदय कठीण आणि शुष्क झाले की,
माझ्यावर दयेची बरसात कर.
जीवनातून कृपा हरवली की
गाण्याचा ओघ घेऊन ये
कामाचा क्षुब्ध गोंगाट चहुबाजूंनी वाढला,
नि बाहेरून मला बंदिस्त करून टाकलं,
की हे शांततेच्या देवा,
तुझं प्रेम नि विश्रांती घेऊन माझ्याकडे ये
भिकाऱ्यासारखं माझं हृदय, दबा धरून कोपऱ्यात बसून राह्यले,
की द्वार तोडून टाक, माझ्या राजा.
आणि राज्यभिषेक घेऊन ये
लालसेने आंधळे केले मनाला, धूळ आणि संभ्रमाने,
की हे पवित्र देवा, नित्य जागृता,
तुझा प्रकाश नि मेघगर्जना घेऊन ये.

माझ्या शुष्क हृदयात, पाऊस कित्येक दिवस आखडलेलाच आहे,
क्षितिज सताड उघडंवाघडं आहे,
कोमल मेघाचे हलकेसेही पांघरूण नाही,
की थंडगार वर्षेची निसटतीही चाहूल नाही
तुझी इच्छाच असेल, तर
पाठव तुझं क्रोधीत वादळ;
मृत्युने काळंकुळकुळीत झालेलं आणि
विजेच्या पापण्यांनी नभाला ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत हादरवणारं.
पण माझ्या देवा, आत पसरलेला हा शांत उष्मा,
हट्टी आणि क्रूर असा,
आत्यंतिक निराशेने हृदयाला जाळणारा,
तो मात्र परत घे!
तातांचा प्रकोप होतो, त्या दिवशीच्या,
आईच्या अश्रुभरल्या नयनांसारखा,
तुझ्या कृपेचा मेघ, खाली झुकू दे.

स्वतःला सावल्यांमध्ये लपवत
या सर्वांच्या मागे, तू आहेस कुठे उभा, माझ्या प्रियकरा?
धुळीने माखलेल्या रस्त्यावर, तुला धक्का देऊन ते पुढे जातात
तुला खिजगणतीतही न घेता.
तुझ्यासाठी ओंजळ भरून,
कंटाळवाणे तासनतास मी मात्र इथे करते आहे प्रतीक्षा
वाटसरू येत आहेत आणि एकामागून एक
माझी फुले घेऊन जात आहेत.
माझी परडी जवळजवळ रिकामी होत आली आहे.
सकाळ संपली आहे नि दुपारही सरली आहे.
सायंकाळच्या सावलीत डोळे झोपेने पेंगुळले आहेत.
घरी परतणारे पुरूष माझ्याकडे नजर टाकतात नि हसतात
शरमेने आपादमस्तक काळवंडते मी!
परकर चेहेऱ्यावर ओढून भिकारणीसारखी बसते.
ते विचारतात, काय हवे आहे तुला?
मी खाली वळवते नजर, नाही देत त्यांना उत्तर.
खरंच, कसं बरं सांगू मी त्यांना.
की, थांबले आहे मी तुझ्यासाठी
तू वचन दिलं आहेस मला येण्याचं
हे दारिद्र्य मी हुंडा म्हणून ठेवलं आहे,
असं सांगण्याची लाज नाही का वाटणार?
ओह, मी ठेवलाय हा अभिमान, गुप्त कवटाळून माझ्या उरात.
मी गवतावर बसते नि आकाशाकडे एकटक बघत स्वप्न पहाते,
तुझ्या अकस्मात आगमनाच्या भव्य सुंदरतेचे;
सारे दीप प्रज्वलित झालेले,
रथावर फडफडणाऱ्या सोनेरी पताका,
रस्त्याच्या कडेला, ते सर्वजण आश्चार्याने आ वासून उभे!

आपल्या आसनावरून तू खाली उतरतोस;
नि धुळीतून मला उठवून तुझ्या शेजारी बसवतोस.
ही विदीर्ण भिकारीण थरथरते लाजेने आणि अभिमानाने;
ग्रीष्मातल्या झुळुकेने वेल थरथरते तशी.
पण समय सरतो घरंगळत,
अजूनही तुझ्या रथाच्या चाकांचा आवाज नाही
अनेक मिरवणुका धामधूम करत,
विजयाच्या झगमगाटात जातात निघून
या सर्वामागे आणि सावलीमध्ये तूच तेवढा आहेस का
शांतसा उभा?
आणि मीच फक्त आहे का ती प्रतीक्षा करणारी, रडणारी,
नि व्यर्थ झुरत हृदयाला विदीर्ण करणारी?

भल्या पहाटे कुजबुज झाली नौकाविहाराची
फक्त तू आणि मी
कोणत्याही देशात न जाणाऱ्या
नि कोणताही अंत नसलेल्या, ह्या तीर्थयात्रेविषयी,
थांगपत्ता नव्हता लागणार, जगातल्या एकाही आत्म्याला
त्या किनारा नसलेल्या महासागरात,
तुझ्या शांतपणे ऐकणाऱ्या स्मितात,
माझ्या गाण्याचे होणार होते सुमधुर संगीत;
लाटांसारखं मुक्त,
शब्दापासून बंधमुक्त.
ती वेळ अजून आली नाही का?
अजून कामे बाकी उरली आहेत का?
पहा, किनाऱ्यावर संध्याकाळ उतरली आहे,
विरणाऱ्या प्रकाशात उडत उडत,
समुद्रपक्षी घरटयांकडे परतत आहेत.
कुणास ठाऊक, साखळ्या कधी तुटतील?
आणि सूर्यास्ताच्या अंतिम किरणासारखी,
नौकादेखील अदृश्य होईल रात्रीत?

तुझ्याकरता मी तत्पर नव्हतो त्या दिवशी,
तू माझ्या हृदयात प्रवेशलास, न सांगता सवरता.
सामान्य लोकांतलाच अगदी एक बनून मलाही न कळता.
आणि माझ्या राजा,
माझ्या जीवनातल्या अनेक उडत्या क्षणांवरती,
स्वाक्षरी केलीस, शाश्वततेची.
आणि आज,
अगदी सहजच मी उजळते ते सारे क्षण.
तेव्हा तुझी स्वाक्षरी पाहिली.
मला दिसलं ,
की विखुरली आहेत अक्षरे त्या धुळीत,
मिसळली आहेत,
त्या साध्याशा दिवसांच्या सुखदुःखांच्या स्मृतीत;
जे केव्हाच गेले होते माझ्या विस्मृतीत.
धुळीतल्या माझ्या बालिश खेळाकडे,
तू पाठ फिरवली नव्हतीस तिरस्काराने.
आणि,
ताऱ्याताऱ्यांमधून जी पावले घुमतात,
तशीच पावले मी ऐकली होती, माझ्या क्रीडागृहात!

सावल्या पाठलाग करत असतात प्रकाशाचा;
ग्रीष्म उजाडताना बरसतात धारा पावसाच्या,
तिथे रस्त्याच्या कडेला थांबून ते पहात बसणं
हा आनंद आहे माझा
दूत येतात, अज्ञात नभांच्या वार्ता घेऊन
मला भेटतात; नि रस्त्याने जातात घाईघाईने निघून
वहात्या झुळुकेला श्वास असतो मधुर
अंतर्यामी हृदय माझं, आनंदाने येथे भरून
पहाटेपासून तिन्हीसांजेपर्यंत असा
दारासमोर माझ्या, इथे बसतो मी जसा,
अचानक कळतं मला,
क्षण आनंदाचा येईल, जेव्हा मी तो पाहीन
मधल्या काळात मी हसतो नि गातो एकटाच
वातावरण भरून जातं आश्वासक सुगंधात.

त्याच्या नीरव पावलांची चाहूल तुम्ही ऐकली नाही काय?
तो येतो, नक्कीच येतो, नेहमीच येतो
हरेक क्षणी, हरेक युगात,
दर दिवशी, दर रात्री,
तो येतो, नक्कीच येतो, नेहमीच येतो
गायली आहेत गाणी मी अनेक,
मनाच्या भिन्न भिन्न भावावस्थेत
पण केलंय जाहीर नेहमी, त्या सर्वच सुरांनी
की तो येतो, नक्कीच येतो, नेहमीच येतो
स्वच्छ सूर्यप्रकाशाच्या सुंगधी वासंतिक दिवसात,
अरण्यातील मार्गांनी,
तो येतो, नक्कीच येतो, नेहमीच येतो.
आषाढातल्या रात्रीच्या पावसाळी उदासीत,
गडगडणाऱ्या नभांच्या रथातून
तो येतो, नक्कीच येतो, नेहमीच येतो
दुःखामागून दुःखामध्ये त्याच्याच पावलांचा तर येतो
माझ्या हृदयावर भार;
सोनेरी स्पर्शदेखील त्याच्याच पावलांचा, उजळतो माझा आनंदभाव

कोणत्या पुरातन काळापासून, मला भेटायला,
तू सतत येत आहेस जवळ, कोण जाणे.
त्याची पुष्टी म्हणजे,
लपवू शकत नाहीत तुला माझ्यापासून
क्षणभरही, तुझे सूर्यतारे
ऐकला आहे मी तुझा पायरव
सकाळी नि संध्याकाळीही बरेचदा
बोलावलंय मला तुझ्या दूतांनी
गुप्ततेत येऊन हृदयात, कित्येकदा
कळत नाही मला, मग आजच तेवढं का
जीवन निघालयं ढवळून माझं?
नि वहातोय अनावर आनंद हृदयातून माझ्या?
जणू काही, काम आवरते घेण्याची वेळ आली आहे,
तुझ्या मधुर अस्तित्वाचा हलकासा गंध मला हवेत जाणवत आहे.

व्यर्थ सरली रात्र, त्याच्या प्रतीक्षेत
सकाळी, तो दारी येईल अवचित,
नि मी मात्र असेन, श्रांत गाढ निद्रेत,
असे भय वाटते मला
मित्रांनो, त्याच्यासाठी मोकळा ठेवा रस्ता; अडवू नका त्याला
त्याच्या पावलांच्या आवाजाने, जाग आली नाही जर मला,
तर प्रार्थना आहे तुम्हाला, की उठवायचा प्रयत्न करू नका मला
माझी आहे इच्छा, की
पक्ष्यांच्या किलबिलाटाने नि पहाटेच्या प्रकाशोत्सवातल्या
वाऱ्याच्या दंग्याने, जाग येऊ नये मला.
देव आला जरी माझ्या द्वारी अचानक, तरी झोपू देत मला अविचल.
थांबली आहे माझी निद्रा, अमूल्य निद्रा,
त्याच्याच स्पर्शाने फक्त, नाहीशी व्हायला.
झोपेच्या काळोखातून उदयाला येणाऱ्या स्वप्नासारखा,
जेव्हा तो राहील माझ्यासमोर उभा.
त्याच्या स्मिताच्या प्रकाशातच फक्त तेव्हा,
उघडतील, माझ्या बंद डोळ्यांच्या पापण्या
तो माझ्यासमोर प्रकटावा,
सर्व प्रकाशांचा नि सर्व स्वरूपांचा प्रारंभ म्हणून.
त्याच्या दृष्टिक्षेपाने यावी, माझ्या जागृत आत्म्याला,
आनंदाची प्रथम अनुभूती.
आणि, माझं स्वतःमध्ये परतणे ठरावे,
त्याच्यामध्ये तात्काळ विलीन होणे.

पहाटेचा शांतीसागराचा भंग झाला, विहंगगायनांच्या तरंगाने
मार्गावरची सारी फुले, नहात होती आनंदाने.
सोन्याची संपत्ती, विखुरली होती मेघांच्या फटींमधून
तेव्हा व्यस्तपणे निघून गेलो आम्ही, आमच्या मार्गाने
लक्षही न देता तिकडे
नाही गायली आनंदाने गाणी, नाही देवाणघेवाण केली गावी;
ना हसलो ना बोलतो काही, की वाटेवर रेंगाळलो नाही जराही.
जसा सरत होता समय, पावले उचलली घाईघाई.
सूर्य आला माध्यान्ही, छायेत कूजन करू लागले पारवे
नाचून दुपारच्या गरम हवेत, भोवऱ्यासारखी उडाली वाळकी पाने
मेंढपाळही पेंगुळला, वटवृक्षाच्या सावलीत स्वप्ने पाहू लागला.
मीही पहुडलो जलकिनारी, थकले भागलेले हातपाय,
ताणून दिले जरा गवतात.
सोबती हसले मला कुत्सितपणे
उंचावून अपुले मस्तक, चालत राहिले अविरत.
ना पाह्यले वळून मागे, ना विसावले जरासे
दूरवरच्या धूसर निळाईत, पहाता पहाता झाले नाहीसे
त्यांनी ओलांडल्या अनेक टेकडया आणि हिरवळीची मैदाने
पार केले कित्येक अनोळखी देश नि दूरदूरचे प्रदेश
सर्व सन्मान आणि श्रेय तुझेच आहे देवा,
त्या अंत नसलेल्या मार्गाच्या, नायक यजमाना!
उपहास आणि निर्भर्त्सना, टोचून उठवत होती मला,
पण प्रतिसाद माझा, काही मिळत नव्हता तिला
आनंदी अपमानात, खोलवर हरवून जाण्यासाठी,
अंधुक आनंदाच्या छायेत, शरण गेलो होतो मी.
सूर्य – कशिदामंडित हिरवाईची निद्रा

हळहळू पसरली, हृदयावरती माझ्या.
प्रवास होता कशासाठी, तेही गेले विस्मृतीत
बिनविरोध मन गेले शरण, छायागानांच्या जाळीत

गुंगीतून अखेरीस जाग आली मला
उघडले मी डोळे, नि तूच दिसलास मला,
माझ्या बाजूला उभा असलेला,
तुझ्या हास्याने ओघवीत, माझ्या निद्रेला
मार्ग आहे लांबचा आणि खडतर,
तुझ्यापर्यंत पोहोचण्याचे यत्न आहेत दुर्धर
अशी कशी बरं भीती वाटली होती मला?

तुझ्या सिंहासनावरून तू खाली उतरलास,
आणि माझ्या झोपडीच्या दारात उभा राह्यलास
मी एकटाच होतो कोपऱ्यात गात
ते सूर शिरले तुझ्या कानात
तू खाली आलास,
नि उभा राह्यलास, झोपडीच्या दरवाजात
तुझ्या दरबारी आहेत अनेक उस्ताद
गायनवादन सुरू असते तेथे सर्व प्रहरांत.
तरीदेखील छेडल्या गेल्या तुझ्या प्रेमाच्या तारा
नवशिक्याच्या या, आनंदी गाण्याने साध्या
एक निरागस लहानसे काव्य
गुरफटले, जगाच्या महान संगीतात
आणि बक्षीस म्हणून फूल घेऊन
तू अवतरलास, माझ्या झोपडीच्या दारात

दारोदारी याचना करीत, फिरत होतो मी,
गावातल्या रस्त्यारस्त्यातून
तेवढयात दुरून येताना नजरेस पडला त्याचा सुवर्णरथ
एखाद्या भव्य, सुंदर, आल्हाददायक स्वप्नासारखा.
मी विस्मयचकित; कोण बरे असेल हा राजांचा राजा?
माझ्या आशाअपेक्षा उंचावल्या वाटलं,
संपले एकदाचे माझे वाईट, दुष्ट दिवस.
मी प्रतीक्षेत उभा.
अयाचित कृपेसाठी आणि
धुळीत सर्वत्र विखुरलेल्या अगणित संपत्तीसाठी.
माझ्यापाशी येऊन रथ थांबला.
त्याची नजर माझ्यावर पडली. स्मितहास्य करीत तो खाली उतरला.
मला वाटलं, सुदिन उगवला अखेर आपल्या आयुष्यात.
अचानक, आपला उजवा हात धरून तो म्हणाला,
'काय देणार आहेस तू मला?'
ओह्! काय थट्टा होती ती! राजाने केलेली;
आपली ओंजळ पसरून भिकाऱ्याकडे भीक मागण्याची.
मी गोंधळलो, अनिश्चितपणे घुटमळलो; आणि मग
मी माझ्या झोळीतून सर्वात लहानसा मक्याचा दाणा काढला
आणि त्याच्या ओंजळीत टाकला.
दिवसअखेरीस मी झोळी ओतली जमिनीवर,
आणि अहो आश्चर्यम्!
त्या दरिद्री राशीत चमकत होता, एक लहानसा सोन्याचा दाणा
मी रडलो धाय मोकलून
त्याला सर्वस्व देऊन टाकण्याइतके हृदय,
असते जर माझ्याजवळ?

रात्र गडद झाली. दिवसभराची कामे संपली.
आम्हाला वाटले, रात्रीकरता शेवटचा पाहुणा येऊन गेलाय.
गावातले एकूण एक दरवाजे बंद झाले.
काहीजणच फक्त म्हणाले, 'राजा अजून यायचा आहे.'
आम्ही हसलो नि म्हणालो, 'नाही, शक्यच नाही.'
असं वाटलं की दरवाजावर थापा पडताहेत.
आम्ही म्हणालो, 'वाराच असणार, दुसरंतिसरं कुणीच नसणार!'
दिवे मालवून आम्ही झोपायला गेलो
काहीजणच फक्त म्हणाले, 'दूत आहे हा!'
आम्ही हसलो नि म्हणालो, 'नाही, तो वाराच असणार!'
त्या गाढ मध्यरात्री मग एक आवाज आला.
झोपेत आम्हाला वाटलं, तो दूरवरच्या गडगडाटाचा आवाज आहे.
धरणी हलली, भिंती हादरल्या, आमच्या झोपेत व्यत्यय आला.
काहीजणच फक्त म्हणाले, 'हा चाकांचा आवाज आहे!'
पेंगुळल्या स्वरात आम्ही पुटपुटलो,
'नाही, हा ढगांचा गडगडाट आहे!'
रात्र अद्यापि गडद होती, तेव्हा ढोल वाजला.
आवाज आला, 'उठा! वेळ लावू नका!'
भीतीने आम्ही थरकापलो; छातीवर हात घट्ट दाबून धरले,
काहीजण म्हणाले, 'पहा तर, राजाचा झेंडा!'
पाय उंचावत आम्ही उभे राहिलो नि किंचाळलो,
'जराही वेळ नाही?'
राजा आला आहे. – पण दीप कुठे आहेत? पुष्पमाला कुठे आहेत?
त्याला आसनस्थ करण्यासाठी सिंहासन कुठे आहे!
अरे देवा! शरमेने काळंवडलो आम्ही!
'दरबार कुठे आहे? शोभिवंत सजावटी कुठे आहेत!'
कोणीतरी म्हणाले, 'व्यर्थ आहे हा आक्रोश!

रिक्त हस्ते त्याचे स्वागत करा!

तुमच्या ओक्याबोक्या खोल्यात त्याला घेऊन जा!'

दरवाजे उघडा! शंखध्वनी होऊ द्यात!

गहिऱ्या रात्री आला आहे, आपल्या काळोख्या भयानक घराचा राजा?

आकाशात मेघगर्जना सुरू आहेत. विजेने अंधाराचाही

थरकाप होतोय!

आण तुझी फाटकी सतरंजी नि

अंथर ती अंगणात!

अचानकच आला आहे वादळासोबत;

भयानक रात्रीचा आमचा राजा!

वाटलं, मागावी जरा तुझ्याकडे
गळ्यात रूळणारी तुझी ती गुलाबमाला,
पण धैर्यच झालं नाही तसं,
म्हणून थांबले, सकाळ होईपर्यंत.
तू निघून गेलास, की काही तुकडे मिळतील शय्येवर म्हणून
शोधू लागले पहाटे, एखाददुसरी चुकार पाकळी,
एखाद्या असहाय्य याचकासारखी
अरेरे, बिचारी मी! हे काय सापडलं मला? तुझ्या प्रेमाचं कोणतं
बरं प्रतीक उरले होते तिथे?
तिथे होतं ना फूल, ना गंध, ना सुंगधी जलकलश,
ती होती तुझी शक्तिमान तलवार, ज्योतीसारखी तळपती,
सौदामिनीसारखी जड भारी
सकाळचा कोवळा सूर्यप्रकाश खिडकीतून प्रवेशला नि
तुझ्या शय्येवर पसरला.
पहाटपक्षी टिवटिवला, म्हणाला, ‘स्त्रिये, काय मिळालं तुला?’
‘नाही रे, फूल नाही, गंध नाही, सुंगधी जलकलशही नाही!
ती आहे त्याची भयानक तलवार!’
मी बसले, आश्चर्याने विचारात गढले.
ही कसली बरं देणगी आहे तुझी?
ती लपवायला, मला मिळत नाही जागा.
परिधान करायला, लाज वाटते मला; सुकुमार तर आहे मी!
शिवाय, छातीशी ती दाबली, की दुखतेच तर मला!
तरीही, दुःखभाराचा हा सन्मान, तू दिलेलं हे बक्षीस,
पेलू का मी माझ्या हृदयात?
यापुढे माझ्यासाठी, नाही उरणार भय जगात,
विजयी ठरशील तूच, माझ्या सर्व संघर्षात.
मरण ठेवले आहेस तू मागे, सख्यासाठी माझ्या,

शिरपेच चढवीन मी त्यावर, जीवनाचा माझ्या.
तुझी तलवार आहे माझ्यापाशी,
माझे बंध तोडून पृथक करण्यासाठी.
नाही उरणार जगात आता, भय माझ्यापाशी.
यापुढे त्यागत आहे मी सर्व क्षुल्लक सजावटी.
हे मतहृदयस्वामी,
आता नाही माझ्याकरता, वाट पहाणं नि कोपऱ्यात बसून रडणं
लाजाळूपणा नि आचरणातला गोडवा.
तू दिली आहेस मला, तलवार अलंकार म्हणून,
बाहुलीची सजावट आता माझ्याकरता नाही.

तुझी मनगटी सुंदरच आहे;
ताऱ्यांनी जडवलेली नि
अपरिमित रंगांच्या रत्नांनी चातुर्याने घडवलेली.
पण मला अधिक सुंदर भासते, ती तुझी तलवार.
भगवान विष्णूच्या दैवी पक्ष्याच्या पसरलेल्या पंखासारखी, तिची
ती विजेची किनार,
सूर्यास्ताच्या क्रोधित रक्तवर्णात चपखल तोल साधणारी.
मृत्युचा अखेरचा आघात होताना, ती शहारते, वेदनेच्या उन्मादात.
जणू जीवनाचा अंतिम प्रतिसाद असल्यासारखी.
ती उजळून निघते प्रखर झोताने;
जणू मृण्मयी जाणीव जाळणाऱ्या विशुध्द ज्योतीसारखी
तुझी मनगटी सुंदरच आहे,
ताऱ्यांच्या मौल्यवान खडयांनी जडवलेली,
पण तुझी तलवार, हे मेघगर्जनेच्या देवा,
घडवली आहेस अप्रतिम सुंदरतेने,
ती धारण करणे वा तिचा विचारही करणे भयानकच आहे रे!

काहीच मागितलं नाही मी तुझ्याकडे,
की उच्चारलं नाही माझं नावही तुझ्या कानी.
मी शांत होतो उभा, तू रजा घेतलीस तेव्हा.
एकटाच होतो मी विहिरीच्या काठी
झाडाची सावली तिथे तिरपी पडली होती.
पाण्याने काठोकाठ भरलेले मातीचे घडे घेऊन
स्त्रिया गेल्या होत्या घराकडे.
त्यांनी मला बोलावलं नि ओरडून सांगितलं,
'चल आमच्यासोबत, सकाळ उलटून होत आली आहे दुपार.'
पण अस्पष्ट विचारांच्या मननात,
मी रेंगाळलो काही वेळ निरूत्साहात
ऐकलाही नाही मी तुझ्या पावलांचा आवाज!
खिन्न नजर तुझी, पडली माझ्यावरती.
तू बोललास खालच्या सुरात, थकलेल्या आवाजात,
'आह! मी आहे एक तहानलेला प्रवासी!'
मी जागा झालो, माझ्या दिवास्वप्नामधून
तुझ्या ओंजळीत ओतले पाणी, मी माझ्या भांडयामधून
माथ्यावरती झाली पानांची सळसळ
अदृश्य काळोखातून गायला कोकीळ.
बाबला फुलांचा सुगंध लहरला, रस्त्याच्या वळणावरून
तू विचारलेस माझे नाव, शरमेने मी झालो अवाक्.
खरंच, मी असं काय केलं होतं, जे तुझ्या राहिलं लक्षात?
पण मी पाणी देऊ शकलो, तुझी तहान भागवण्यासाठी.
ही आठवण माझ्या हृदयात कायमची राहील,
माधुर्य त्यातील उलगडत जाईल.
सकाळ होऊन बराच वेळ झाला आहे.
पक्षी थकल्या सुरात गात आहे.
कडुनिंबाच्या पानांची सळसळ ऐकू येते आहे.

बसून मी विचार आणि विचारच करतो आहे.

तुझ्या हृदयाला आली आहे ग्लानी
नेत्र सुस्तावलेले आहेत अजूनी
पुष्पसौंदर्य अधिराज्य गाजवते आहे काटयांमधूनही
ही वार्ता आली नाही का तुझ्या कानी?
ऊठ अरे, जागो हो! समय सरू देऊ नकोस व्यर्थ!
जिथे संपतो दगडाधोंडयांचा मार्ग,
तिथे त्या विशुध्द एकांत प्रदेशात
माझा मित्र बसलेला आहे एकटाच!
नको फसवूस त्याला!
ऊठ अरे, जागा हो!
माध्यान्हीच्या सूर्याच्या उष्याने जरी धापा टाकू लागले,
नि थरथरू लागले आकाश,
वाळूने पसरलेले असले आपले तृष्णापात्र,
तरी असे काय मोठे झाले?
तुझ्या हृदयात आनंद खोलवर दडलेला नाही काय?
तुझ्या प्रत्येक पावलापाशी
मार्गाचा बिगुल, वेदनेचे मधुर संगीत वाजवत नाही काय?

तर, आहे हे असे की, पूर्ण भरलाय तुझा आनंद माझ्यामध्ये,
तर आहे हे असे की तू आला आहेस खालती माझ्याकडे
अरे स्वर्गाच्या मालका,
मी नसतो, तर तुझं प्रेम कुठे गेले असते?
या संपत्तीत तू केलं आहेस मला भागीदार
तुझ्या आनंदाचा खेळ चाललाय अखंड माझ्या हृदयात
इच्छा तुझीच आकार घेईल माझ्या आयुष्यात
हे असे घडण्यासाठी,
तू, जो आहेस राजांचा राजा,
स्वतःच नटला आहेस सौंदर्यात,
माझ्या हृदयाला बंदिवान करण्यासाठी.
हे असे घडण्यासाठी.
तुझे प्रेम हरवते, तुझ्याच प्रियकराच्या प्रेमात,
आणि नजरेस पडते, ती दोघांची परिपूर्ण युती.

अंतहीन विश्वांच्या समुद्रतटी मुले जमली आहेत.
माथ्यावरचे असीम आभाळ निश्चल आहे
आणि चंचल पाणी खळखळते आहे.
अंतहीन विश्वाच्या समुद्रतटावर नाचत नि खिदळत
मुले जमली आहेत.
ती बांधतात वाळूची घरे,
आणि खेळतात रित्या शिंपल्यांसमवेत.
करतात वाळक्या पानांच्या होडया नि सोडून देतात अथांग
खोलीत, हसत हसत
विश्वांच्या समुद्रतटी मुलांचा खेळ चालला आहे.
त्यांना ठाऊक नाही पोहायचे कसे नि जाळी विणायची कशी?
पाणबुडे घेतात मोत्यांसाठी पाण्यामध्ये डुबकी
व्यापारी हाकारतात जहाजे आपली
तर मुले करतात लहानलहान खडे गोळ नि
विखरून टाकतात पुन्हा.
गुप्त खजिन्यामध्ये त्यांना नाही रस
की जाळी विणणेही त्यांना नाही ठाऊक.
हसत हसत उसळतो सागर नि
फिकुटसे प्रकाशते समुद्रकिनाऱ्याचे हास्य.
मृत्यूशी सौदा करणाऱ्या लाटा,
मुलांसमोर बाष्फळ गाणी गातात
बाळाच्या पाळण्याला झोके देताना आई गाते ना, तशी
समुद्र खेळतो मुलांशी नि
सागरतटीचे हास्य फिकुटसे प्रकाशते.
अंतहीन विश्वाच्या समुद्रतटावर मुले जमा होतात.
पथहीन आकाशात वादळ भटकते.
माग हरवलेल्या पाण्यात गलबते फुटतात.

मरण दूरवर पसरते आणि
मुले खेळत रहातात.
अंतहीन विश्वांच्या सागरातटी मुलांची महाभेट घडते.

होय, मला कळलंय, फक्त प्रेमच आहे हे!
माझ्या प्राणप्रिया, पानांवर नाचणारा हा सोनेरी प्रकाश.
आकाशात तरंगणारे हे निरूद्देश मेघ;
वाहताना आपली शीतलता माझ्या भाळी ठेवून जाणारी ही
वाऱ्याची झुळूक,
पहाटेच्या प्रकाशाने माझ्या डोळ्यात अश्रूंचा पूर लोटला आहे;
माझ्या हृदयाशी पोहोचलेला तुझा हा संदेश आहे.
तुझा चेहरा आकाशातून खाली वाकून पहातो आहे.
तुझे नेत्र माझ्या नेत्रांमध्ये पहात आहेत.
आणि माझ्या हृदयाने तुझ्या चरणांना स्पर्श केला आहे.

बाळाच्या नयनांवरून भुर्रकन् उडणारी ती झोप,
ठाऊक आहे का कुणाला ती येते कुठून?
होय तर! वदंता आहे अशी की तिचं घर आहे त्या तिथे;
चमचमणाऱ्या काजव्यांनी अंधुक उजळलेल्या वनाच्या सावल्यांत
आहे परीचं एक गाव;
रहातात तिथे भित्र्या, दोन जादूच्या कळ्या.
तिथून ती येते, बाळाचे नयन चुंबिण्यास
निद्रिस्त बालकाच्या ओठी तरळणारे ते स्मितहास्य,
ठाऊक आहे का कुणाला, ते कुठे जन्मले?
होय तर! वदंता आहे अशी की,
चंद्रकोरीचा फिकट कोवळा किरण स्पर्शला,
शरदातल्या अदृश्य होत जाणाऱ्या मेघकिनारीला,
अन् दवभिजल्या उषःस्वनी, मग त्या स्मिताचा जन्म झाला.
बाळाच्या अंगावर विलसणारा तो मधुर मुलायम तजेला,
ठाऊक आहे का कुणाला, तो होता कुठे लपलेला?
होय तर! त्याची आई होती जेव्हा लहानशी बाला,
प्रेमाच्या कोमल मुग्ध गूढतेत, तो होता तिच्या हृदयी व्यापलेला.

माझ्या बाळा,
तुझ्यासाठी मी रंगीबेरंगी खेळणी आणते
आणि मला कळते;
की मेघांवर नि पाण्यावर रंगांचा खेळ का चाललेला असतो.
नि फुलांवर एवढया रंगछटा का रंगवल्या आहेत,
माझ्या बाळा
तुझ्यासाठी मी रंगीबेरंगी खेळणी आणते तेव्हा.
तू नाचावेस म्हणून मी जेव्हा गाते,
तेव्हा खरंच मला कळते,
की पानांच्या सळसळीत संगीत का आहे
आणि लाटांचे समूहगान
श्रोत्या सृष्टीच्या हृदयाची तार का छेडते,
तू नाचावेस म्हणून मी जेव्हा गाते,
तुझ्या लालचावलेल्या हातांवर गोड खाऊ मी ठेवते
आणि मला कळते,
की फुलांचे कोश मधाने का भरले आहेत,
आणि फळांमध्ये गुप्तपणे सुमधुर रस का भरला आहे
तुझ्या अधाशी हातांवर गोड खाऊ मी जेव्हा ठेवते.
तू हसावेस म्हणून तुझ्या चेहऱ्याचा मी मुका घेते;
आणि मला कळतेच
की उषःकालच्या प्रकाशात कोणत्या आनंदाचे झरे वहातात
आणि ग्रीष्मातली वाऱ्याची झुळूक माझ्या शरीराला कशी सुखावते
तू हसावेस म्हणून तुझ्या चेहऱ्याचा मी जेव्हा मुका घेते.

परिचय करून दिलास, तू अपरिचित मित्रांचा
जागा दिलीस मला त्या घरात, माझ्या मालकीच्या नसलेल्या.
दूरस्थांना जवळ आणलेस आणि अपरिचिताला बंधू केलेस
सवयीचे झालेले माझे घर सोडताना
माझे हृदय सैरभैर होते
मला विसर पडतो की
इथे नाविन्यात जुन्याचे बंध आहेत;
नि तूही तेथे बध्द आहेस.
जन्म आणि मृत्युमधून
या जगातून किंवा इतर विश्वांतून,
जेव्हा जेव्हा तू मला मार्ग दाखवतोस,
तेव्हा तो तू आणि तूच असतोस;
माझ्या अनंत आयुष्याचा एकमेव सांगाती
जो जोडतो माझ्या हृदयाला,
आनंदाच्या बंधांनी, अपरिचितांशी.
एखाद्याची तुझ्याशी ओळख होते तेव्हा
उरत नाही कोणताही दुरावा
आणि बंद होत नाही कोणताही दरवाजा
प्रभो, सफल कर माझी प्रार्थना
की अनेकांच्या खेळात, मी हरवू नये कधीच,
त्या एका स्पर्शाचा आशीर्वाद

निर्जन नदीच्या उतारावरल्या उंच उंच गवतात विचारले मी तिला,
‘ललने, तू चालली आहेस कोठे, आडोसा धरून तुझ्या दिव्याला?
माझं घर आहे एकाकी नि पूर्ण अंधारलेले,
तुझा दिवा दे मला.’
क्षणभर तिने आपले काळेभोर डोळे उचलले
नि संधिप्रकाशात माझ्याकडे पाह्यले.
म्हणाली, ‘मी नदीवर आहे चालले,
सूर्य मावळला पश्चिमेला, की प्रवाहात सोडून द्यायला माझ्या दिव्याला
एकटाच उभा राहून उंच गवतात,
पाह्यली मी तिच्या दिव्याची भित्री ज्योत,
जाताना दूर, लाटेवर व्यर्थ तरंगत.
हळूहळू गोळा होणाऱ्या रात्रीच्या शांततेत विचारलं मी तिला,
‘हे तरूणी, तुझ्याकडचे सर्व दिवे तर आहेत उजळलेले.
मग हा दिवा घेऊन, तू निघाली आहेस कुठे?
माझं घर आहे एकाकी नि पूर्ण अंधारलेले,
तुझा दिवा दे मला.’
आपले काळेभोर डोळे माझ्या चेहऱ्यावर खिळवले तिने
नि क्षणभर उभी राहिली संदिग्धतेने.
अखेरीस ती उच्चारली, ‘मी आले आहे,
माझा दिवा आकाशाला वाहून टाकायला.’
मी पहात राह्यलो,
त्या पोकळीत व्यर्थ जळताना तिचा दिवा.
चांद्रविहीन मध्यरात्रीच्या त्या उदासीत, विचारलं मी तिला,
हृदयाशी दिवा धरून, कसला घेते आहेस तू शोध?
माझं घर आहे एकाकी नि पूर्ण अंधारलेले,
तुझा दिवा दे मला.’
मिनिटभर ती थांबली, विचार केला नि काळाखोत

एकटक माझ्या चेहऱ्याकडे पाह्यले.
‘दिवा आणला आहे मी,’ ती म्हणाली,
‘दिव्यांच्या उत्सवात सहभागी व्हायला.’
मी पहात राह्यलो,
त्या इतर दिव्यांमध्ये,
तिचा लहानसा दिवा व्यर्थ हरवताना.

भरभरून वहाणाऱ्या माझ्या जीवनाच्या प्याल्यातून
तू कोणते स्वर्गीय पेय भरले आहेस, देवा?
माझ्या कविराजा,
माझ्या नेत्रांमधून पहावी तुझीच निर्मिती, आणि
माझ्या कानांपाशी थांबून शांत श्रवण करावी,
तुझीच शाश्वत स्वरसंगती
यातच तुला आनंद वाटतोय का?
तुझे विश्व, माझ्या मनात शब्दांची गुंफण करते आहे,
तुझा आनंद, त्यात संगीताची भर टाकतो आहे,
प्रेमामध्ये तू तुलाच स्वतःला, देऊन टाकले आहेस मला,
आणि मग,
माझ्यामध्येच जाणवतो आहे तुला, तुझाच पूर्ण गोडवा.

माझ्या अस्तित्वात कायम खोलवर दडून राह्यलेली ती,
संधिप्रकाशातही नि त्याच्या ओझरत्या दर्शनातही,
सकाळच्या प्रकाशातही अवगुंठन कधी दूर न सारणारी ती,
तिचीच घालून घडी, तुला मी ती देईन, देवा,
अखेरची माझी भेट म्हणून, माझ्या अंतिम गीतामधून.
शब्दांनी केली तिची मनधरणी;
पण जिंकू शकले नाहीत तिला काही.
पाठपुराव्याने तिच्यासाठी उत्सुक बाहू पसरले,
पण व्यर्थच गेले सारे.
हृदयाच्या गाभारी तिला ठेवूनी, मी भटंकती केली देशविदेशातूनी
तिच्याच भोवती घडला, माझ्या जीवनवृध्दीचा उदय
नि जीवनऱ्हासाचा अस्त.
विचारांतून नि कृतींमधून
ग्लानीतून नि स्वप्नांमधून,
तिनेच केलं अधिराज्य;
अन् तरीही राहिली एकाकी नि अलिप्त.
अनेकांनी माझ्या दरवाजावर टकटक केली,
तिची मागणी केली नि निराशेने पाठ फिरविली.
तिला प्रत्यक्ष पाह्यलेय, असा कोणीच माणूस नाही जगात
तुझ्या मान्यतेच्या प्रतीक्षेत, ती रहातेय तिच्या एकांतात.

अंबरही तूच नि घरटेही तूच
हे सुंदरा, त्या घरटयात वसते आहे तुझे प्रेम
रंग, नाद नि गंधांनी आत्म्याला वेढून टाकणारे.
सकाळ उगवते ती,
उजव्या हाती सोन्याची परडी धरून,
त्यात सौंदर्याचे पुष्पहार भरून,
सृष्टीवरती शिरपेच चढवायला.
आणि सायंकाळ अवतरते, ती
गाईगुरांचे कळप निघून गेल्यावर, एकाकी उरलेल्या कुरणांवर
माग नसलेल्या मार्गामधून,
पश्चिमेच्या प्रशांत महासागरातून,
शीतल शांतीचे वारे तिच्या सोनेरी घडयातून भरून.
मात्र, आत्म्याने भरारी घ्यावी म्हणून,
जिथे अमर्याद आकाश विस्तारलेले आहे
तिथे अधिराज्य गाजवते निष्कलंक शुभ्र तेज
तिथे ना दिवस ना रात्र
ना आकार ना रंग, ना एखादाही शब्द.

तुझा सूर्यकिरण येतो, बाहू फैलावत,
या माझ्या धरतीवर,
नि उभा रहातो माझ्या दरवाजापाशी,
चैतन्यभरित दिवशी,
माझे अश्रू, निःश्वास नि गाण्यांनी बनलेले मेघ,
परत घेऊन जाण्यासाठी, तुझ्या पायांपाशी.
वत्सल प्रेमाने तू लपेटून घेतोस
तुझ्या तारकामय वक्षाभोवती, धुक्याचे मेघावरण;
त्यांचे असंख्य आकार नि अगणित घडया बनवत,
आणि सतत बदलणाऱ्या रंगछटांनी त्यांना रंगवत.
ते आहे किती हलकं नि क्षणभंगुर!
कोमल, अश्रुभरलं आणि गहिरं!
नि म्हणून तर आहे तुझं आवडतं;
अरे निष्कलंका अन् धीरगंभीरा.
तुझ्या अतिशुभ्र प्रकाशावर म्हणूनच कदाचित
आपल्या दयनीय सावल्या ते असेल पांघरीत.

दिवसरात्र माझ्या धमन्यांतून वहाणारा तो जीवनप्रवाह
आणि विश्वातून वहाणारा, तालबध्द नृत्य करणारा तो जीवनप्रवाह
एकच आहे.
जमिनीवरल्या धुळीतून असंख्य तृणपात्यांमधून उसळणारे
आणि पानाफुलांच्या सळसळत्या लाटांमधून फुटू पहाणारे
जीवनही तेच आहे.
जन्म मृत्युच्या झोक्यातून, प्रवाहाच्या भरती ओहोटीतून,
महासागरी हेलकावणारेही,
तेच जीवन आहे.
मला वाटते, जीवनाच्या या विश्वस्पर्शाने माझे अंगप्रत्यंग
बनवले आहे तेजस्वी.
आणि युगांयुगांपासून जीवननाडीत भिनलेला माझा अभिमान
माझ्या रक्तातून नृत्य करीत आहे याही क्षणी.

या तालाच्या सुखात, सुखी रहाणे, तुझ्या आवाक्याबाहेरचे आहे का?

या भीतीदायक आनंदाच्या भोवऱ्यात गरगरणं, हरवणं नि भंग पावणंही?

सर्व गोष्टी घाईने पुढे जातात.

त्या थांबत नाहीत की मागे वळून पहात नाहीत.

कोणतीही शक्ती त्यांना पकडून ठेवू शकत नाही.

त्या वेगाने पुढे जातच रहातात.

त्या अविश्रांत, जलद संगीतावर पदन्यास करीत,

ऋतू नाचत येतात नि निघून जातात.

रंग, सूर नि सुगंधाचे असंख्य धबधबे त्या विपुल आनंदात ओतत रहातात.

जो आनंद, क्षणोक्षणी विखुरतो, शरण येतो नि मरण पावतो.

माझ्यामधून मी बरेच काही निर्मावे,
ते चहुबाजूंना फिरवावे,
म्हणजे, त्यातून निर्माण होणाऱ्या रंगीत सावल्या पडतील
तुझ्या तेजावरती;
अशी आहे तुझी माया.
तू स्वतःच एक अवरोध निर्मितोस, तुझ्याच स्वत्वात,
आणि विविध स्वरांनी पुकारतोस, त्या तोडलेल्या स्वत्वास.
तू स्वतःमध्येच निर्मिलेली ही विलगता,
मग धारण करते माझी काया.
अनेकरंगी अश्रू आणि स्मितांमधून
भय आणि आशांमधून.
गुंजले आहे मर्मभेदी गान, साऱ्या आकाशातून.
लाटा उसळतात, पुन्हा विरतात,
स्वप्ने भंगतात नि पुन्हा जन्मतात.
तुझ्याच स्वत्वाचा पराजय होत आहे, माझ्यात.
तू उभारलेला हा पडदा,
दिवसरात्रीच्या कुंचल्याने
असंख्य आकृत्यांनी आहे चितारलेला.
त्यामागे असणारे तुझे आसान.
सरलतेच्या साऱ्या विराण रेषांना दूर ठेवीत,
वलयांकित जादुई रहस्यांनी विणलेले आहे.
तुझी न माझी महान शोभायात्रा, आभाळ व्यापून राहिली आहे.
तुझ्या माझ्यातील स्वरमेळाने,
संपूर्ण हवा चैतन्यविभोर झाली आहे.
तुझ्या माझ्यातील ह्या पाठशिवणीच्या खेळात,
युगानयुगे सरत आहेत.

माझ्यातल्या सर्वात आतला तो आहे.
खोलवर दडलेल्या त्याच्या स्पर्शांनी माझे अस्तित्व
जागवणारा तो, तोच आहे.
त्याची जादू या डोळ्यांवर पसरणारा आणि
माझ्या हृदयीच्या तारा, सुखदुःखांच्या विविध स्वरांच्या
लयबध्दतेने छेडणारा तो, तोच आहे
निळ्या हिरव्या अन् सुवर्णरूपेरी क्षणभंगुर रंगछटांनी हे
मायाजाल विणणारा तो, तोच आहे
आणि त्याच्या पायघडयांतून डोकावू देणारा अन्
ज्याच्या स्पर्शात मी स्वतःला हरवून बसतो तो, तोच आहे
दिवस येतात नि युगे लोटतात,
नाना नानांनी, नाना मिषांनी, सुखदुःखांच्या अनेक बेहोशीमधूनी
माझे हृदय हेलावणाराही तोच आहे.

माझा मोक्ष नाही सर्वसंग परित्यागात;
स्वातंत्र्याचे आलिंगन मला जाणवते,
आनंदाच्या हजारो बंधांत.
माझ्याकरता तू ओतत रहातोस सतत,
नाना रंगांच्या नि गंधांच्या वारूणीचे ताजे झोत
आणि भरत रहातोस हे मृत्पात्र, ओतप्रोत.
दीप शतविध माझ्या विश्वातले, उजळील तुझीच ज्योती,
आणि ठेवेल ते तुझ्या मंदिराच्या वेदीवरती
नाही, मी कधीही बंद करणार नाही माझ्या जाणीवेंद्रियांची द्वारे,
दृष्टी, श्रवण व स्पर्शाचे सुख धारण करतील तुझ्या आनंदाचे रूपडे.
होय, जळून जातील माझे सारे भ्रम आनंदाच्या प्रकाशात,
साऱ्या इच्छा माझ्या, परिपक्व होतील प्रेमफलात.

दिवस मावळला आहे नि पृथ्वीवर सावली धरली आहे.
झऱ्यावर जाऊन घडा भरण्याची वेळ आली आहे.
पाण्याच्या करूण संगीताने संध्याकाळची हवा उत्सुक झाली आहे.
ओह्! संधिप्रकाशात येण्यासाठी ती मला खुणावते आहे.
त्या एकाकी गल्लीत एकही पांथस्थ नाही.
वारा सुटला आहे;
नदीच्या पाण्यातील मंद लाटांना ऊत आला आहे.
मी परत घरी जाईन की नाही, कुणास ठाऊक.
कोणी अवचित भेटेल की नाही, कुणास ठाऊक
नदीच्या उतारावरच्या त्या लहानशा होडीत
सारंगी वाजवत बसला आहे, एक अनोळखी माणूस.

पूर्ण करतात तुझ्या देणग्या
आम्हा मर्त्य सजीवांच्या साऱ्या इच्छा.
तरीही त्या परत धाव घेतात,
अक्षयत्वात तुझ्यामधल्या.
सरितेला करायचे आहे, रोजचे आपले काम,
म्हणून ती पळत सुटते, शेतात नि खेडयापाडयात.
तरीही तुझे चरण धुण्यास,
तिचा खळाळता झरा येतो वहात.
फूल आपल्या सुगंधाने हवेला माधुरी आणते.
तरीही, तुला वाह्यले जाणे ही त्याची अखेरची सेवा असते.
तुझी आराधना केल्यामुळे काही
विश्वाला निर्धनता येत नाही.
कवीच्या शब्दांमधून माणसे अर्थ काढतात,
त्यांना सुखावेल असा,
तरीही, तुझ्याकडेच बोट दाखवतो,
अंतिम अर्थ त्यातला.

दिवसानुदिवस, हे माझ्या जीवनदेवा,
तुजसम्मुख मी उभा राहू शकेन का?
हात जोडून हे विश्वेश्वरा,
तुजसम्मुख मी उभा राहू शकेन का?
महान आभाळाखाली, एकांतात नि शांततेमध्ये, नम्र हृदयाने,
तुजसम्मुख मी उभा राहू शकेन का?
या तुझ्या कष्टमय जगात.
परिश्रम नि धडपडींच्या क्षुब्द जगात, घाईगर्दी करणाऱ्या जथ्यात,
तुजसम्मुख मी उभा राहू शकेन का?
आणि या जगातले माझे कार्य संपेल तेव्हा,
हे राजांच्या राजा,
एकटा नि निःशब्द असा
तुजसम्मुख मी उभा राहू शकेन का?

मी ओळखतो तुला माझा परमेश्वर म्हणून
नि उभा रहातो बाजूस
नाही जाणत मी तुला माझा स्वतःचा म्हणून
नि येत नाही निकट.
मी ओळखतो तुला माझा पिता म्हणून
आणि नमितो तुझ्या चरणांना
मित्राचा हात घ्यावा हाती, तसा
तुझा हात धरत नाही काही
तू खाली येतोस तिथे
उभा काही मी रहात नाही;
तू माझा आहेस म्हणून स्वामित्व सांगत नाही
माझ्या हृदयाशी तुला धरीत नाही;
आणि सोबती म्हणून स्वीकारत नाही.
तू आहेस माझ्या बंधूंमधला बंधू
पण मी देत नाही इतरांकडे लक्ष
त्यांच्यामध्ये नाही वाटत माझी मिळकत
म्हणून वाटून घेतो माझे सर्वस्व, तुझ्याचसोबत.
सुखदुःखात मी नाही रहात इतर माणसांच्या बाजूला,
तर रहातो तुझ्या सोबतीला
मी आक्रसतो, माझे जीवन तुझ्या स्वाधीन करण्यासाठी,
म्हणून झेप घेत नाही जीवनाच्या महाप्रवाही.

नुकतीच झाली होती जेव्हा विश्वाची निर्मिती,
प्रभा फाकली होती प्रथमच, ताऱ्यांची चमचमती,
देवतांची तेव्हा भरली सभा आकाशात,
गायनाची मग तेथे झाली सुरूवात.
'वाहवा!' परिपूर्ण चित्र! विशुध्द आनंद!'
अचानक परंतु चीत्कार उमटला एक
'कुठेतरी झालाय वाटते, प्रकाश शृंखलेचा भंग,
हरवला आहे वाटते, तारा एक.'
वीणेची त्यांच्या, सोनेरी तार तुटली अचानक.
थांबले गान त्यांचे, आक्रोश उमटला आर्त.
'होय, तो हरवलेला तारा, होता सर्वोत्तम.
स्वर्गलोकीचे होते ते, तेजस्वी वैभव
त्या दिवसापासून सुरू आहे शोध, त्या ताऱ्याचा अव्याहत,
एकाकडून दुसऱ्याकडे क्रंदन आहे पसरत
की विश्वाने गमावले आहे, त्या ताऱ्यात एक आनंद
रात्रीच्या गहनतम शांततेतच फक्त
तारे हसतात नि आपापसात कुजबुजतात.
'व्यर्थ आहे हा शोध!
अखंडित परिपूर्णता आहे सर्वंकष!'

या माझ्या आयुष्यात तुला भेटणे, हा भाग जर नसेल,
तर तुझी नजर मी गमावली आहे, असे मला कायम वाटू दे.
क्षणभरही मी विसरू नये.
या दुःखाची वेदना माझ्या स्वप्नी नि जागेपणीही मला वाहू दे.
जगाच्या गजबजलेल्या बाजारात जसे दिवस चाललेत माझे,
आणि रोजच्या नफ्याने, हात पूर्ण भरून गेलेत माझे,
तेव्हा काहीही कमावले नाही मी; असे मला कायम वाटू दे.
क्षणभरही मी विसरू नये,
या दुःखाची वेदना माझ्या स्वप्नी नि जागेपणीही मला वाहू दे.
माझ्या खोल्या सजवलेल्या असताना, बासरी निनादत असताना,
हास्यविनोद फुलत असताना,
तुला मी माझ्या घरी बोलावलेलं नाही, असे मला कायम वाटू दे.
क्षणभरही मी विसरू नये.
या दुःखाची वेदना माझ्या स्वप्नी नि जागेपणीही मला वाहू दे.

मी आहे आकाशात व्यर्थ भटकणाऱ्या शरदातील चुकार मेघासारखा
माझ्या नित्य तेजोमय भास्करा,
तुझ्या स्पर्शाने माझी वाफ अजून विरून गेलेली नाही,
तुझ्या किरणांशी एकरूप झालेली नाही;
तुझ्यापासून दुरावून महिने आणि वर्षे मोजतो आहे मी.
अशीच जर तुझी असेल इच्छा
ह्याच जर असेल तुझा खेळ,
तर घे हे माझे क्षणभंगुर रितेपण,
रंगव ते रंगांनी, सोन्याचा दे मुलामा त्यावर,
खेळकर वाऱ्यावर लहरू दे त्याला,
आणि विस्तारू दे नाना चमत्कृतीत त्याला,
नि मग पुन्हा एकदा,
हा खेळ संपविण्याची जेव्हा तुला होईल इच्छा,
तेव्हा जाईन मी वितळून रात्री आणि होईन काळोखात नाहीसा.
किंवा शुभ्र पहाटेच्या स्मितात,
मिसळून जाईन, पारदर्शी शुभ्रतेच्या गारव्यात.

कधी दिवस जातात आळसात, वाया जातो वेळ,
कित्येकदा मला वाटत रहाते हळहळ.
पण कधीच व्यर्थ गेलेले नसतात ते पळ, माझ्या देवा,
कारण तुझ्या हाती घेतला आहेस तू, माझ्या जीवनाचा प्रत्येक क्षण.
गोष्टींच्या हृदयी लपून
तू कोंब उगवतोस, बीजांचे पोषण करून.
फुलवतोस बहर, कळ्यांमधून.
आणि सुफळता, पक्व फुलांमधून.
श्रांत होऊन झोपलो होतो मी, मोकळ्या बिछान्यावर माझ्या,
सारी कामे संपली आहेत, अशी केली होती कल्पना.
जाग आली सकाळी;
नि माझी बाग, फुलांच्या जादूने पूर्ण बहरून आलेली पाहिली.

समय अंतहीन आहे, तुझ्या हातांमधला,
कोणीही नाही माझ्या देवा, तुझी मिनिटे मोजायाला.
सरतात दिवस आणि रात्री
बहरतात आणि कोमेजतात युगे फुलांसारखी
जाणतोस तू, प्रतीक्षा कशी करावी.
जातात तुझी शतकानुशतके,
एक लहानसे वन्य फूल परिपूर्ण करण्यामध्ये
आमच्याकडे गमवायला वेळ नाही आणि
वेळ नसल्यामुळे आम्हाला संधीसाठी झोंबाझोंबी करायला हवी.
उशीर परवडण्याइतके काही आम्ही सधन नाही.
आणि म्हणून, वेळेवर दावा सांगणाऱ्या प्रत्येक चिडखोर माणसाला
मी देत जातो वेळ, नि जात जातो माझा वेळ.
तुझी वेदी अखेरपर्यंत रहाते रिती,
वाहिल्याशिवायच मात्र काही.
दिवसअखेरीस मी करू लागतो घाई,
तुझे द्वार बंद व्हायची असते भीती.
पण जाणवते मला की
तिथे वेळ उरत आहे अजूनी बाकी.

हे जगन्माते,
दुःखाश्रूंनी माझ्या, मी गुंफणार आहे माळ मोत्याची,
तुझ्या गळ्यात घालण्यासाठी.
ताऱ्यांनी घडवले आहेत प्रकाशाचे पैंजण,
तुझी पावले सजवण्यासाठी.
माझी माळ मात्र विराजणार आहे तुझ्या छातीवरती.
संपत्ती आणि प्रसिध्दी देतेस तूच
काढूनही घेतेस नि रोखूनही धरतेस तूच
पण हे दुःख मात्र आहे निव्वळ माझे एकटयाचेच
पायी तुझ्या वहायला घेऊन येतो मी जेव्हा ते,
देतेस तू मला बक्षीस, तुझ्या कृपाप्रसादाचे.

वियोगाची तीव्र वेदना व्यापून टाकते चराचर.
अनंत आकाशात, त्यातून जन्मतात, अगणित आकार.
वियोगाचे हे दुःख़,
ताऱ्याकडून ताऱ्याकडे टक लावून पहाते, रात्रभर निस्तब्ध शांततेत;
नि त्याचे बनते संगीत, आषाढातल्या पावसाळी काळोखातल्या.
पानांच्या सळसळीत.
गहिरे बनते हे व्यापक दुःख,
प्रेमात आणि इच्छा आकांक्षात,
घराघरातल्या हालाअपेष्टांत नि आनंदात.
माझ्या कवी हृदयातही हेच दुःख
विरघळून वहाते माझ्या कवितांत आणि गाण्यात.

योध्दे जेव्हा पहिल्या प्रथम बाहेर पडले मालकाच्या दरबारामधून,
तेव्हा कोठे लपवली होती त्यांनी आपली शक्ती?
त्यांची चिलखते आणि शस्त्रे कोठे होती?
ते दिसत होते निराधार नि दरिद्री,
आणि त्यांच्यावर शरबरसात झाली,
ती ते मालकाच्या दरबारातून बाहेर पडले, त्या दिवशी.
योध्दे जेव्हा परत गेले मालकाच्या दरबारात, कवायत करीत,
तेव्हा कोठे लपवली होती त्यांनी आपली शक्ती?
त्यांनी तलवार टाकून दिली होती,
धनुष्य़बाण टाकून दिला होता;
त्यांच्या भालप्रदेशी विराजत होती शांती,
आपले जीवनफल ठेवले होते त्यांनी आपल्यासाठी,
जेव्हा ते परत गेले मालकाच्या दरबारात,
कवायत करीत, त्या दिवशी

मृत्य, तुझा सेवक, आला आहे माझ्या दारी.
त्याने पार केलाय अज्ञात सागर नि
तुझे बोलावणे आणले आहे माझ्या घरी.
रात्र गडद झाली आहे नि माझे हृदय भयग्रस्त आहे.
तरीही मी दिवा घेईन, माझे दरवाजे उघडीन आणि
त्याचे स्वागत करीन लवून.
कारण, तो तुझा दूत आहे, जो माझ्या दरवाजाशी उभा आहे.
त्याची मी पूजा करेन अश्रूंनी आणि हात जोडून भक्ती करेन,
त्याच्या पायाशी माझ्या हृदयाचा खजिना ठेवून.
तो परत जाईल, त्याच्या प्रवासाचा उद्देश पुरा करून,
माझ्या प्रभातीवर गडद सावली ठेवून.
नि माझ्या एकाकी घरात फक्त उरेल,
माझा परित्यक्त आत्मा,
तुला माझे अखेरचे अर्पित म्हणून

असाध्य आशेने मी जातो आणि शोधतो
खोलीच्या कानाकोपऱ्यात त्याला,
पण तो काही सापडत नाही मला.
माझे घर आहे लहानसे आणि
एकदा का काही गेले त्यातून की पुन्हा कधी मिळत नाही परत.
पण तुझे घर तर आहे अथांग, माझ्या देवा,
आणि मी आलोय तुझ्या द्वारी, शोधत त्याला.
सायंकाळच्या आकाशात मी उभा आहे, सुवर्णाच्या छताखाली
माझे उत्सुक नेत्र खिळले आहेत, तुझ्या चेहऱ्यावरती.
मी पोहोचलो आहे, शाश्वततेच्या काठी
जिथून नष्ट होत नाही काही,
ना आशा, ना सुख, ना अश्रूंतून दिसणारे मुख
ओह्, माझे रिक्त जीवन त्या महासागरात बुडवून टाक,
गहनतम पूर्णत्वात भिजवून टाक.
मला एकदा तरी अनुभवू दे,
तो हरवलेला मधुर स्पर्श, विश्वाच्या सर्वंकषतेत.

भग्न देवालयातल्या देवते!
वीणेच्या तुटलेल्या तारा आता गात नाहीत तुझी स्तुतिसुमने
सायंकालच्या घंटा घोषत नाहीत तुझ्या पूजेची वेळ.
हवा रहाते तुझ्याविषयी स्तब्ध आणि मूकपणे.
तुझ्या उद्‌ध्वस्त घरी येते, उनाड वसंताची झुळूक,
फुलांच्या लहरी घेऊन,
जी फुले, तुझ्या पूजेकरता आता कोणी वहात नाही अर्पून.
कृपेसाठी सतत आसुसलेला नि
अजूनही नकार मिळणारा,
तुझा जुना भक्त, करीत येतो भटकंती,
ज्वाला आणि सावल्या धुळीच्या उदासीत गुरफटतात, जेव्हा सायंकाळी
तेव्हा, दमूनभागून नि हृदयात भूक घेऊन तो परततो, या भग्न देवालयी.
हे भग्न देवालयातल्या देवते!
उत्सवाचे अनेक दिवस तुझ्याकडे शांतपणे येतात,
पूजेच्या अनेक रात्री दिवा उजळल्याविना निघून जातात.
चतुर कलेचे उस्ताद अनेक नवीन प्रतिमा बांधतात आणि
त्यांची वेळ येते तेव्हा, विस्मृतीच्या पवित्र झऱ्यात वाहून जातात.
भग्न देवालयातील देवता फक्त रहाते,
पूजेवाचून, अमर्त्य उपेक्षेत.

मी बोलू नयेत कोलाहलाचे, उच्च स्वराचे शब्द पुन्हा
अशी आहे माझ्या मालकाची इच्छा.
यापुढे कुजबुजीतच होतील सारे माझे व्यवहार
गाण्याची गुणगुणच वाहून नेईल हृदयीच्या, बोलांना
राजदरबारी माणसे जात आहेत घाईगडबडीने
तेथे जमले आहेत, ग्राहक आणि विक्रेते.
पण मी मात्र रजा घेतोय अवेळी,
दिवस आला असता माध्यान्ही,
आणि कामाची असता ऐन गर्दीही.
मग वेळ नसली झाली तरी, फुले येऊ देत माझ्या बागेत.
माध्यान्हीच्या मधमाशांची आळशी गुणगुण होऊ देत तेथे.
अनेक तास घालवले आहेत मी,
चांगल्या नि वाईटाच्या संघर्षात.
पण आता, माझ्या रिकाम्या दिवसांच्या सोबत्याचे सुख
माझ्या हृदयाला खेचते आहे तेथे.
आणि ह्या निरर्थक विसंगतीची साद,
का बरं आली आहे अचानक?
ते मला उमजत नाहीये.

मृत्यू तुझा दरवाजा ठोठावेल, त्या दिवशी तू त्याला काय देशील?
ओह्, माझ्या जीवनाचे संपूर्ण पात्र, त्या अतिथीसमोर मी ठेवीन.
मी त्याला परत जाऊ देणार नाही, रिक्तहस्ते कधीही.
शरदातील माझ्या दिवसांचा नि ग्रीष्मातील रात्रींचा सारा मधुर द्राक्षरस,
माझ्या व्यस्त जीवनातली सारी मिळकत,
आणि गोळा केलेले ज्ञान
मी त्याच्यासमोर ठेवीन.
माझे दिवस भरतील तेव्हा, मृत्यू माझा दरवाजा ठोठावेल तेव्हा.

ती जीवनाची अंतिम फलद्रुपता,
अरे मृत्यो, माझ्या मरणा,
ये आणि माझ्याशी कुजबुज कर!
दिवस नि दिवस मी तुझ्यावर लक्ष ठेवून आहे.
जीवनातील आनंद नि वेदना मी तुझ्याकरता सहन केल्या आहेत.
मी जो काही आहे,
माझे जे सर्वकाही आहे,
ज्या आशा आहेत आणि जे सारे प्रेम आहे, ते
नेहमी खोलवरच्या गुप्ततेतून तुझ्याकडे वहात आले आहे.
तुझा अखेरचा एक दृष्टिक्षेप
अन् माझे जीवन होईल कायमचेच तुझे.
फुले गुंफलेली आहेत नि वरासाठी फुलांचा हार तयार आहे.
विवाहानंतर वधू तिचे घर सोडणार आहे.
आणि रात्रीच्या एकांतात, तिच्या स्वामीला एकटीच भेटणार आहे.

मला माहीत आहे, तो दिवस येणार आहे,
जेव्हा ही पृथ्वी माझ्या नजरेला पडणार नाही.
माझ्या नेत्रांवर अखेरचा पडदा ओढून
जीवन शांतपणे रजा घेणार आहे.
तरीही रात्री चमकत राहतील तारे,
पूर्वीसारखीच सकाळही उगवेल.
आणि सुखदुःखे निर्माण करीत, प्रहरही निश्वास टाकतील, सागरलहरींसारखे.
माझ्या क्षणांच्या या अंताचा जेव्हा मी विचार करतो,
तेव्हा तुटतात क्षणांचे बंध.
आणि मृत्युच्या प्रकाशात मी पहातो,
निष्काळजी खजिन्याने भरलेले तुझे विश्व.
दुर्मिळ आहे त्यातील नीचतम आसन देखील.
दुर्मिळ आहे त्यातील सर्वात क्षुल्लक जीवन देखील.
ज्या गोष्टींची मला व्यर्थ लागली होती आस,
नि ज्या गोष्टी मला लाभल्यात,
त्या होवोत पार
नि ज्या गोष्टी मी तिरस्काराने झिडकारल्या नि दुर्लक्षिल्या,
त्या मिळोत मला खरोखरी.

मला माझी रजा मिळाली आहे
बंधूंनो, मला निरोप द्या.
तुम्हा सर्वांना मी नमितो आणि आता निघतो.
या बघा, माझ्या दाराच्या चाव्या परत देतोय.
नि माझ्या घराबद्दलचे सारे दावे सोडून देतोय.
तुमच्याकडे फक्त मी अखेरचे प्रेमळ शब्द मागतोय.
बराच काळ आपण शेजारी त्याहून म्हणून राह्यलो
पण मी देऊ शकलो त्याहून जास्त मला मिळाले.
आता दिवस उगवलाय,
नि माझा अंधारा कोपरा उजळणारा दिवा विझलाय
हुकुमाचे बोलावणे आलेय नि
माझ्या प्रवासाला मी सिध्द झालोय.

वियोगाच्या ह्यावेळी मित्रांनो, मला शुभेच्छा द्या.
आकाश पहाटेत न्हायले आहे नि
माझा मार्ग पुढे सुंदर पसरलेला आहे
तिथे नेण्यासाठी माझ्याकडे काय आहे ते विचारू नका.
रिक्तहस्ते नि अपेक्षोत्सुक हृदयाने निघणार आहे मी प्रवासाला
मी घालणार आहे विवाहमाला
पांथस्थाचा लाल तपकिरी वेष नाहीये माझा.
आणि मार्गावर जरी पसरलेली असली अनेक संकटे
तरी भीती नाही वाटत माझ्या मनाला.
प्रवास संपेल तेव्हा, सायंतारा उगवेल
नि राजाच्या प्रवेशद्वारामधून
संधिप्रकाशाच्या सुरेल संगीताचे आर्त स्वर निनादतील.

या जीवनाचा उंबरा ओलांडताना,
त्या क्षणाची मला नव्हती जाणीव,
ती कोणती शक्ती होती,
जिने मुक्त केले मला, या विशाल रहस्यी
वनात उमलणाऱ्या कळीसारखे, मध्यरात्री?
सकाळी जेव्हा मी प्रकाशाकडे पाह्यले,
तेव्हा क्षणात वाटले की परका नाहीये मी या जगात
नाव आणि आकार नसलेल्या त्या सांमिलिकाने
घेतले आहे मला आपल्या बाहूत,
माझ्याच मातेच्या रूपात.
मरणातदेखील तेच अज्ञात घडणार आहे;
जणू मला नेहमीच ज्ञात असल्यासारखे,
असे असूनही, ह्या जीवनावर मी प्रेम करीत असल्याने
मरणावर देखील प्रेम करणार आहे.
बाळाला आई उजव्या पान्ह्यापासून काढते, तेव्हा ते रडते,
पण दुसऱ्याच क्षणी, डाव्या पान्ह्यात त्याला सांत्वन लाभते.

येथून जाईन मी जेव्हा,
हा माझा निरोपाचा शब्द असावा,
की जे पाहिले मी येथे,
ते केवळ अतुलनीय होते.
प्रकाशाच्या महासागरी विस्तारलेल्या,
या कमळातला मध लपलेला,
मी आहे तो चाखलेला.
अशा तऱ्हेने झाली आहे, माझ्यावरती कृपा,
हा माझा निरोपाचा शब्द असावा.
अनंत आकारांच्या ह्या खेलगृही,
मी खेळलो आहे खेळ माझा,
अन् इथेच माझ्या नजरेसमोरी,
तो अनाकार आहे साकारला.
माझे अंगप्रत्यंग थरारले आहे, स्पर्शाने त्याच्या,
जो आहे स्पर्शण्यापलिकडचा.
अंत जर येणार असेल इथे,
तर तो जरूर यावा.
निरोपाचा हा माझा शब्द असावा.

तुझ्यासोबत चालला असता खेळ,
मी नाही विचारला कधी प्रश्न
की तू आहेस तरी कोण?
ना मला ठाऊक होता, लाजरेपणा,
ना माहीत होते भय.
जीवन होते माझे उच्छुंखल.
पहाटे तू मला झोपेतून उठवायचास,
माझ्या साथीदारासारखाच.
नि पुढे होऊन धावायला लावायचास,
मोकळ्या जागांवर जंगलातल्या.
त्या दिवसांत जी गाणी तू गायलीस माझ्याकरता,
त्यांचा अर्थ समजून घेण्याची मी तेव्हा केली नव्हती पर्वा.
माझ्या आवाजाने फक्त, उचलले त्यातील स्वर
नि माझ्या हृदयाने नृत्य केले, त्या तालावर.
आता, खेळाची वेळ संपता संपता अचानक,
ही कसली बरं दृष्टी मिळाली आहे मला?
तुझ्या पायांशी डोळे झुकवून, हे विश्व
आदरयुक्त भीतीने आहे उभे,
आपल्या साऱ्या मूक ताऱ्यांसह.

मी तुला सजवणार आहे,
माझ्या पराभवाच्या हारांनी आणि पदकांनी,
माझ्या हातात कधीच नव्हते, अजेय रहाणे.
मला माहीत आहे खात्रीने,
की माझा गर्व ढासळेल.
वेदनेपलिकडे जाऊन, माझे जीवन त्याचे बंध तोडेल.
नि माझे रिक्त हृदय, हुंदके देईल संगीतामध्ये
एखाद्या पोकळ अलगुजासारखे
आणि दगडही विरघळतील, अश्रूंमध्ये
मला माहीत आहे खात्रीने
की कायम काही मिटलेली रहाणार नाहीत, कमलिनीची शतदले
आणि त्यातील मधाची गुप्त विश्रांती, उघडी पडेल.
निळ्या आभाळातून एक नेत्र टक लावून पाहील माझ्याकडे
नि मला हुकुमी बोलावणे पाठवेल शांतपणे
काहीच उरणार नाही माझ्यासाठी, काहीसुध्दा नाही.
मरण केवळ मिळेल मला, तुझ्या चरणांपाशी.

मला ठाऊक आहे,
मी सुकाणू सोडून देईन तेव्हा,
तू ते तुझ्या हाती घेण्याची वेळ आली असेल.
जे करायचे आहे, ते तात्काळ केले जाईल.
व्यर्थ आहे ही धडपड!
तर मग माझ्या हृदया,
घेऊन जा तुझे हात आणि शांतपणे स्वीकार तुझा पराजय.
आणि तू आहेस तिथेच पूर्णतः स्तब्ध रहाणे,
हे तुझे भाग्य आहे; असे समज.
वाऱ्याच्या प्रत्येक लहानशा झोताने विझत आहेत, ते माझे दिवे
नि ते पेटवण्याच्या प्रयत्नात, मी वारंवार विसरत आहे;
बाकी सारे सारे पण ह्यावेळी मी विवेकी राहीन.
माझी चटई जमिनीवर अंथरून, काळोखात प्रतीक्षा करीन.
आणि माझ्या देवा, जेव्हा वाटेल तुला आनंद,
तेव्हा ये शांतपणे, आणि घे इथे तुझे आसन.

आकारांच्या महासागरी मी खोलवर मारतो सूर
निराकाराचा परिपूर्ण मोती मिळण्याची आशा धरून.
वातावरणाने झोडपलेली ही माझी नाव
यापुढे नाही करणार, बंदरा बंदरातून प्रवास
केव्हाच मागे पडले ते दिवस
माझा खेळ जेव्हा होतो, लहरींसोबत उचंबळत
आता मी उत्सुक आहे, मरण्यासाठी अमर्त्यात,
अगाध खोलीवरच्या, त्या श्रोतृगृहात
स्वरविहीन तारांचे संगीत झंकारते जिथून,
नेणार आहे तेथे मी, माझ्या जीवनाचे बिगुल.
शाश्वतेच्या सुरांशी ते जुळवून,
अंतिम सुरांच्या स्फुंदका बाहेर पडला त्यातून,
की शांततेच्या चरणी माझे शांत बिगुल, देईन मी ठेवून.

तुझा शोध घेत राह्यलो मी माझ्या गाण्यांमधून आयुष्यभरी
गाणीच घेऊन गेली मला दारोदारी
शोधताना नि स्पर्शताना माझे विश्व
मी जाणवलो मला, त्यांच्यामधूनच.
गाण्यांनीच शिकवले मला, मी शिकलेले सारे धडे
अन् गुप्त मार्गही त्यांनीच, दाखवले मला सारे.
माझ्या हृदयीच्या क्षितिजावरचे तारे
त्यांनीच माझ्या दृष्टीसमोरी आणले.
सुखदुःखाच्या देशातल्या रहस्यांकडे घेऊन गेली ती मला दिवसभर
आणि शेवटी, माझ्या प्रवासाच्या अखेरी सायंकाळी,
ती मला घेऊन आली आहेत, कोणत्या राजगृहाद्वारी?

लोकांमध्ये मी मारल्या बढाया
की जाणत होतो मी तुला
माझ्या साऱ्या कामांमधून, ते पहातात तुझी चित्रे,
येतात ते नि विचारतात मला, ‘तो कोण आहे?’
मला कळत नाही, त्यांना काय उत्तर द्यावे.
मी म्हणतो, ‘मी सांगू शकत नाही खरे.’
मला दोष देतात ते नि निघून जातात कुत्सितपणे
नि तू बसतोय आपला हसत तिथे.
तुझ्याबद्दलच्या माझ्या कथा मी मांडतो, गुंजणाऱ्या गीतांमध्ये
रहस्य माझ्या ह्रदयातून उसळून बाहेर पडते.
ते येतात नि मला विचारतात, ‘सारे अर्थ सांग आम्हाला त्याचे’
मला कळत नाही, त्यांना काय उत्तर द्यावे.
मी म्हणतो, ‘ओह्, कोणास ठाऊक, त्याचा अर्थ काय आहे ते!’
ते हसतात आणि निघून जातात अत्यंत कुत्सितपणे
नि तू बसतोय आपला हसत तेथे

माझ्या परमेश्वरा,
तुला केलेल्या एका वंदनात,
माझ्या साऱ्या जाणिवा विस्ताराव्यात;
तुझ्या पायांशी, ह्या विश्वाला स्पर्शाव्यात.
न बरसलेल्या वर्षेच्या ओझ्याने खाली झुकलेल्या
आषाढातल्या वर्षामेघाप्रमाणे
माझे संपूर्ण मन, तुझ्या द्वारापाशी खाली झुकावे,
तुला केलेल्या एका वंदनात.
साऱ्या माझ्या गानांचे विविध धागे, मिळावेत एकत्र प्रवाहात,
नि वहावेत शांततेच्या समुद्रात,
तुला केलेल्या एका वंदनात.
घराची ओढ लागलेल्या बगळ्यांचा थवा
जसा पर्वतावाच्या घरटयांमध्ये परततो, रात्रंदिवस उडत,
तसा करावा माझ्या संपूर्ण जीवनाने आपला प्रवास,
त्याच्या घराकडे शाश्वत;
तुला केलेल्या एका वंदनात.